# बागेच्या माहितीचें पुस्तक.

हें पुस्तक

विष्णु सदाशिव आणि कंपनी

नरसरी आणि सीड्स्मेन्

गोसावीपुरा, पुणें.

यांनीं तयार करून

पुणें

येथील " ज्ञानप्रकाश " छापखान्यांत छापून प्रसिद्ध केलें.

सन १८९४.

आवृत्ति दुसरी.



किंमत दीड रुपया.

# प्रस्तावना.

या हिंदुस्थान देशांत हल्लीं आपल्या लोकांस बागबगीचे करण्याची अभिरुचि बरीच लागली आहे; व याजबद्दल मराठी भाषेंत स्वदेशीय व परदेशीय भाजीपाला, फुलझाडें व फळझाडें वगैरेच्या माहितीचीं पुष्कळ पुस्तकें झालीं आहेत, परंतु त्या सर्व पुस्तकांत दिलेल्या माहितीपासून शेतकऱ्यांस किंवा बागाईत करणारांस वास्तविक जो फायदा व्हावयाचा तो न होतां त्यांनीं त्या माहितीप्रमाणें केलें असतां उलटें उत्पन्नापेक्षां जवळ जवळ दुप्पट किंबहुना जास्ती खर्च लागतो, असें त्यांस अनुभवानीं कळून येईल. म्हणून केवळ स्वानुभविक, व ज्यापासून लोकांस विशेष फायदा होईल अशीच माहिती या पुस्तकांत दिली आहे. ह्या पुस्तकांत जरी बरेच ठिकाणीं इंग्रजी नांवाचा समावेश झाला आहे, व हें पुस्तक स्वतःच्या अनुभवाशिवाय जरी कांहीं इंग्रजी पुस्तकांच्या आधारानें लिहिलें आहे, तरी हें केवळ इंग्रजी पुस्तकांचें भाषांतरच आहे असें समजूं नये.

पहिल्या आवृत्तीमध्यें विलायती भाजीपाला व फुलझाडें वगैरेचीच माहिती फक्त दिली होती, परंतु अनुभवानीं असें कळून आलें कीं, विलायती प्रमाणें स्वदेशीय भाजीपाल्यांची, फुलझाडांची व फळझाडांची माहिती देणें अवश्य वाटल्यावरून त्याचा या दुसऱ्या आवृत्तींत बराच समावेश केला आहे. यांत ज्या ज्या ठिकाणीं जरूरी दिसली त्या त्या ठिकाणीं झाडांचीं, फुलांचीं, भाजीपाल्यांचीं व बागेसंबंधीं हत्यारांचीं चित्रेंही दिलीं आहेत; पहिल्या आवृत्तीप्रमाणें हेंही लोकप्रिय होईल अशी उमेद आहे.

# अनुक्रमणिका.

## अनुक्रमणिका.

# बागेच्या माहितीचें पुस्तक.

## वनस्पतिशास्त्राविषयीं माहिती.

सृष्टिकर्त्यानें ह्या जगांत नानाप्रकारचे पदार्थ निर्माण केले आहेत, त्यांमध्यें पुष्कळ भेद आहेत, परंतु ज्यांचा एकमेकांशीं निकट संबंध आहे, असे मुख्य दोन भाग आहेतः—प्राणी आणि वनस्पति.

प्राणी आणि वनस्पति ह्यांमध्यें मुख्य भेद हा आहे कीं, प्राण्यांची कृति वनस्पतींच्या कृतीच्या केवळ उलट आहे. ती अशीः—प्राण्यांच्या श्वासोच्छ्वासांतून जो प्राणघातक वायू ( कॉरबॉनिक आसीड ) निघतो तोच वायू वनस्पतींचा पोषक होय; त्यांतील वनस्पतिपोषक वायू ( कॉर्बन ) आपले करितां घेऊन राहिलेला प्राणरक्षक वायू ( ऑक्सिजन ) हवेंत टाकितात, ज्यावर प्राण्यांचें जीवित्व केवळ अवलंबून आहे. ज्याप्रमाणें प्राण्यांस रक्ताचें चलनवलन होण्याकरितां परमेश्वरानें शिरा व नाड्या दिल्या आहेत, त्याप्रमाणें वनस्पतींस रसवाहिन्या दिल्या आहेत, व त्यांचें पक्काशयाचें काम मुळ्या व जमीन करितात. ज्याप्रमाणें प्राण्यांस हृदय त्याप्रमाणें वनस्पतींस हवा, पाणी, व जमीन यांची अवश्यकता आहे. वनस्पतींची उत्पत्ति प्राण्याप्रमाणेंच आहे; वनस्पतींच्या फुलांमध्यें एक पुरुषजातीचें फूल व दुसरें स्त्रीजातीचें फूल असे दोन भेद असतात, त्यांचा संयोग वाऱ्यानें अगर पांखरांच्या योगानें होतो; म्हणजे पांखरें पुरुषजातीच्या फुलांवर बसून स्त्रीजातीच्या फुलांवर सहज बसतात, यामुळें पुरुषजातींच्या फुलांतील पराग स्त्रीजातीच्या फुलांवर साहजिक पडतात आणि तेणेंकरून तीं फलद्रूप होतात.

बागेसंबंधी माहिती देण्यापूर्वी वनस्पतिशास्त्राचें थोडेंसें ज्ञान झाल्यानें विशेष फायदा होईल अशा हेतूनें ही माहिती दिली आहे.

---

## बगीच्याकरितां जागा व जमीन.

श्रीमान् व सुखी गृहस्थ राहण्याकरितां घरें बांधितात, व तीं घरें पायाला धर लौकर लागेल व चोहोंकडून हवा मोकळी मिळेल व इमारतही मजबूत राहील अशा ठिकाणीं बांधितात, अशी जागा उंचवटयावर म्हणजे खडकाळ ठिकाणीं सांपडते, अशा ठिकाणीं इमारत झाल्यावर मागून इमारतीसभोंवतीं बागबगीचा असावा अशी इच्छा साहजिक उत्पन्न होते; परंतु अशा ठिकाणीं बगीचा करणें म्हणजे बऱ्याच मेहनतीचें व खर्चाचें काम आहे; अशा ठिकाणीं बगीचा करते वेळेस दक्षिणेच्या बाजूस व पूर्वेच्या बाजूस लौकर वाढणारीं झाडें लावावींत म्हणजे दक्षिणेकडील व पूर्वेकडील वाऱ्यापासून आंत लावलेल्या झाडांस विशेष उपद्रव न होईल अशी व्यवस्था करावी.

घरासभोंवतालच्या खडकाळ जमिनींत बगीचा करतेवेळीं वनस्पतींचे अंश पुष्कळ प्रमाणानें मिसळले पाहिजेत म्हणजे कुजलेल्या पाल्याचें खत ( ओलें गवत वगैरे पुरून कुजवून केलेलें खत ) पुष्कळ घालावें; सोनखत व बकरीच्या लेंडीचें खत अशीं उष्ण खतें घालूं नयेत. बागेंत हिंडण्याजोगे लहान लहान रस्ते ठेवून नंतर त्यांत फळझाडें व फुलझाडें लावावींत व चांगल्या जमिनींत एखादें झाड लाविलें असतां त्याचा घेर केवढा वाढतो हें अनुमान लक्ष्यांत आणून त्या अंतरानें तीं झाडें लावावींत.

ऐषआरामाकरितां जो बाग करितात त्याची जमीन खालीं लिहिलेल्या प्रकारची असावी; बगीच्याकरितां पसंत केलेली जमीन गांवापासून अगर राहत्या ठिकाणापासून जवळ असावी म्हणजे चाकर लोकांवर देखरेख ठेवण्यास व व्यवस्था पाहण्यास फार सोईचें पडतें. ही जमीन

नदीच्या केवटयाची असावी म्हणजे नदीच्या पुरानें वाहून आलेल्या मातीची असावी व नदीच्या पुरापासून आंत पाणी न येईल अगर नदीच्या पुरानें आंतील झाडांस इजा न होईल व पूर्व व दक्षिण बाजूकडील वाऱ्याचा सपाटा न लागेल अशा प्रकारची जागा बगीचास पसंत करावी, परंतु तशी सोईची जागा घरापासून नजीक न मिळेल व काळी जमीन अगर रेताळ जमीन मिळेल तर खत घालून चांगली जमीन करितां येते. खडकाळ, पाणथळ व चिकणमातीची जमीन असली तर ती मात्र बगीच्यास पसंत करूं नये. बगीचा जेथें करावयाचा तेथें पाणी अखेरपर्यंत पुष्कळ मिळेल अशी जागा पाहून करावा. व बगीचा करण्याची जागा कायम ठरल्यावर त्याचें सभोंवतीं कुंपण घालावें व आंत कुंपणास लागून कवडया लिंब, बकाण वगैरे समोर वाढणारीं झाडें दाट लावावीं व त्या जागेच्या मधोमध लहानशी म्हणजे बैलगाडी जाण्याजोगती सडक करावी म्हणजे खत वगैरे एका कोपऱ्यापासून दुसऱ्या कोपऱ्यापर्यंत नेण्यास मनुष्याची मजूरी जास्त होते ती मजूरी गाडी जाण्याजोगती सडक केल्यापासून कमी होते व याच्यापेक्षां विशेष मुद्याची गोष्ट ही आहे कीं, मालकानें त्या बगीच्यांत लाविलेलीं झाडें नेहमीं पाहिलीं पाहिजेत. व तीं त्याच्या नजरेखालून गेलीं पाहिजेत सबब ही सडक मधोमध असल्या कारणानें मालक त्या सडकेनें गेला म्हणजे दोहों बाजूंस झाडें लावलेलीं त्याचे सहज नजरेस पडतात, मग कोणच्या झाडांस पाणी आहे व झाडांची व्यवस्था माळ्यानें बरोबर ठेविली आहे किंवा नाहीं हें सहज दिसून येतें.

बगीच्यांत झाडें लावणें तीं अमक्याच अंतरावर लावावीं असा बरोबर नियम करितां येत नाहीं, तो नियम मालकानें आसपासच्या बगीच्यांत झाडें केवढीं वाढलेलीं आहेत, त्याचा चौरसचौरस घेर किती आहे हें लक्ष्यांत आणून त्या मानानें हीं झाडें लाविलीं पाहिजेत; कारण कांहीं झाडें कांहीं देशांत हवेच्या मानानें मोठीं वाढतात सबब नियम करितां येत

नाहीं. बागाइतांत दक्षिणेच्या बाजूला अगर पूर्वेच्या बाजूला सुरमाड ( नरळी माड ) हीं झाडें लावावींत म्हणजे आंत लावलेल्या झाडांस दक्षिण बाधत नाहीं.

---

## जमिनीविषयीं माहिती.

या हिंदुस्थान देशांत बागाइतांस जमीन म्हटली म्हणजे नदीच्या पुरानें वाहून आलेली माती ( जिला केवटा असें म्हणतात ) जेथें असते अशी जमीन चांगली. केवटयाचा रंग ज्या आसपासच्या डोंगरांवरून पावसाचें पाणी येतें त्या डोंगरांची जशी माती असेल त्याप्रमाणें बहुतकरून असतो, विशेषेंकरून तो केवटा तांबूस रंगाचा असून बारीक गाळीव असतो व त्यांत वनस्पतीय पदार्थ चांगल्या बऱ्याच प्रमाणानें मिसळलेले असतात.

वर सांगितलेली जमीन नसेल तर काळे मातीची जमीन बागाइतांस चांगली, परंतु त्यांत खत घातलें तर उत्तम प्रतीची सुपीक होते. व याप्रमाणेंच कोणत्याही लागवडीच्या जमिनीस खत घातलें म्हणजे ती चांगली होते परंतु वारंवार राखेचें खत घालूं नये कारण त्यापासून जमिनीच्या अंगीं जी सुपीक करण्याची शक्ति असते ती कमी होते; जमिनीवर जें गवत वगैरे उगवतें तें कोंवळेपणींच काढून जमिनींत पुरावें म्हणजे जमीन सुपीक होण्यास अवश्य जे वनस्पतीय पदार्थ ते तीस मिळतात. आणि ती जमीन चांगली सुपीक होते. बागाइतांस जमीन पानथळ व जिचा तडया वाऱ्यापासून ( पूर्वेकडील ) व पाण्याच्या पुरापासून नुकसान होण्याचा संभव आहे अशी नसावी. जमीन उत्तम प्रकारची नसून फक्त जमिनींत टिकाव किंवा कुदळ मारिली असतां आंत जाते अशा प्रकारची जरी असली तरी ती चांगली सुपीक करितां येते. ती अशी कीं, जमीन खणून त्यांत वनस्पतीय पदार्थांचे पुष्कळ अंश मिसळलेले आहेत असें पुष्कळ खत घातलें म्हणजे ती जमीन सुपीक होते. जी ज-

मीन मूळचीच चांगली, त्या जमिनीपेक्षां वर लिहिलेल्या खडकाळ जमि-
नींत गवत वगैरे उगवतें तेंच उपटून ताजेपणीं जमिनींत पुरलें तर या
जमिनींत फुलझाडें वगैरे चांगलीं होतात.

---

## जमिनीची मशागत.

शेतकीचा उत्कर्ष होण्याचा मार्ग हाच आहे कीं, जमिनीची खणणी किंवा नांगरणी खोल झाली पाहिजे. कारण जमिनीचा वरील भाग ओला असणें यापेक्षां जमीन आंत खोलपर्यंत ओली असणें हें झाडांस हितकारक आहे. जमिनीची खोल खणणी झालेली असली म्हणजे मुळ्या खोल जातात. आणि पाणीही थोडें पुरतें व सूर्याच्या उष्णतेपासून कांहीं उपद्रव न होतां झाडांची वाढ चांगली सदोदित सारखी चालते. नांगरणी व खणणी, व कोणत्याही प्रकारच्या जमिनीची मशागत करण्यास हिंवाळ्याचे दिवस योग्य होत. जर जमीन ओलेपणींच तुडविली गेली, आणि उन्हानें वाळली तर ती कठीण होऊन तिचीं मोठमोठालीं ढेंकळें निघतात. यामुळें जमिनीच्यानें हवेपासून सुपीक करणारे पदार्थ शोषून घेववत नाहींत. कोणच्याही जमिनीची नांगरणी किंवा खणणी उन्हाळ्यांत महिन्यांतून एक वेळ झाली असतां झाडांचें पोषण होणारे पदार्थ ती जमीन हवेंतून शोषून घेते. शेतकरी लोक शेतांत धान्य, गवत वगैरे जें उत्पन्न करितात तें काढून घेतात, आणि त्या जमिनींत ज्यांपासून झाडांचें पोषण होईल असे वनस्पतीय पदार्थ ठेवीत नाहींत, व नवीन आणून घालीत नाहींत; याच कारणानें जसें उत्पन्न व्हावें तसें होत नाहीं तर असें न करितां गवत व कडबा जो उत्पन्न होईल तो शेणाच्या रूपानें व धान्य होतें तें सोनखताच्या रूपानें जमिनीस मिळालें पाहिजे, म्हणजे शेतांत पीक चांगलें होतें, असें शेतकरी लोकांस कळून येईल.

---

## खतांविषयीं माहिती.

सर्व वनस्पतीय पदार्थांपासून झाडांचें पोषण होतें. तथापि कांहीं खनिज पदार्थांतही झाडांचें पोषण होणारे पदार्थ सांपडतात. कोणताही पदार्थ कुजून मातीस मिळाला म्हणजे झाडांचें पोषण होणारें तें खत होतें. कोळशाचा चुरा, कोणत्याही प्राण्यांचीं हाडें, स्वयंपाकाचें उष्टेंखरकटें, यांचें उत्तम खत होतें. शेतांत अगर बागाइतांत जो कचरा झाडून निघतो तो जमिनींत पुरून टाकावा. जर एखाद्या कोंपऱ्यास उगाच ढीग करून ठेविला तर त्यापासून फायदा होणें तो न होतां आसपासच्या नाजूक झाडांस अनहितकारक होतो. सबब वर सांगितलेला केरकचरा एखाद्या खड्ड्यांत टाकून त्यावर माती पसरावी, म्हणजे त्याचें कुजून उत्तम खत होतें.

( १ ) **सोनखत**–सोनखत तयार करण्याचे प्रकार दोन आहेत. कित्येक लोक मैल्याच्या गाडया खड्डयांत ओतितात, आणि खड्डा भरला म्हणजे त्याजवर माती टाकितात अशा रीतीनें फार दुर्गंधी सुटते, आणि हें उत्तम खत खराब होतें. सबब असें न करितां दोन गाडया मैल्याच्या खड्ड्यांत टाकिल्या म्हणजे एक गाडी बारीक गाळींव चांगल्या मातीची त्याजवर पसरावी, या रीतीनें खड्डा भरला म्हणजे नऊ अगर दहा महिन्यांनीं त्या खड्डयांतील खत काढावें म्हणजे जी दुर्गंधी झाडांच्या पोषणास अवश्य आहे ती मातीस मिळून जाते आणि फार उत्तम खत होतें. व या खतास दुर्गंधी येत नाहीं, असें तयार झालेलें खत दहा फूट चौरसचौरस जाग्यास सुमारें चार घमेलीं घालावें. कलीफ्लावर अगर कोबीच्या प्रत्येक झाडास साधारण एक ओंजळ खत घालावें. ज्या झाडांस हें खत घातलें आहे त्या झाडांस वेळच्या वेळीं पाणी अवश्य दिलें पाहिजे. ज्या झाडांस पाण्याची गरज नाहीं अशा झाडांस या खताचा उपयोग करूं नये कारण त्यापासून फायदा न होतां तें झाड मरून जाईल सबब हें फळझाडांस अगर धान्याच्या शेतांस घालूं नये,

भाजीपाल्यांस अगर फुलझाडांस म्हणजे ज्या झाडांस पाणी वेळच्या वेळीं देतां येतें अशांस मात्र हें खत घालावें. भाजीपाल्यांस व फुलझाडांस मानवणारें सोनखतासारखें दुसरें खत नाहीं.

( २ ) **मुताचें खत.**--मूत हें एक फार उत्तमपैकीं खत आहे. म्हणजे सोनखताची बरोबरी करणारें आहे. हें बीट व कोबी व तत्-जातीय भाजीपाल्यांस फार उत्तम मानवतें. परंतु पाणी मात्र वेळचे वेळेस पोहोंचलें पाहिजे. मुताच्या बरोबरीनें त्यांत बारीक गाळींव माती घालून ती थोडी वाळली म्हणजे वर सांगितलेल्या झाडांस घालावी. माती मिसळलेली असली म्हणजे घाण वगैरे येत नाहीं. हें खत या देशांत मिळणें कठीण आहे खरें परंतु जर पुणें अगर मुंबई सारख्या शहरांच्या म्युनिसिपालिटीनें मनावर घेतलें तर मिळण्याजोगें आहे. तें असें कीं, गल्लोगल्लींत मुतारीच्या मोऱ्या बांधलेल्या आहेत, त्यांतून जर हें जमा करविलें, आणि वर सांगितलेल्या कृतीनें तयार केलें तर हो-ण्याजोगें आहे, व यापासून त्यांस फायदाही होण्याचा संभव आहे. या खताविषयीं एक ग्रंथकार असें म्हणतो कीं, एका सशक्त मनुष्याचें एक शेर मूत सहा शेर शेणाबरोबर आहे.

( ३ ) **घोड्यांच्या लिदीचें खत**--घोड्यांची लीद चांगली कु-जल्याशिवाय भाजीपाल्यांस अगर फळझाडांस घातली तर ती झाडांस हितकारक न होतां नाशास कारण होते. जर कुजल्याशिवाय हें खत घातलें तर झाडांस पाणी फार द्यावें लागतें. व पाणी फार दिलें तर झाडें खराब होण्याचा संभव आहे; म्हणून हें खत कुजल्याशिवाय कोण-त्याही झाडास घालूं नये.

( ४ ) **बकऱ्यांच्या लेंडीचें खत**--बकऱ्यांच्या अगर मेंढ्यांच्या लेंडीचें खत हें एक मोठें उष्ण आणि उत्तम खत आहे. भाजीपाल्यां-स हें खत घालणें झाल्यास त्या लेंड्या पाण्यांत भिजत घालून तें पाणी त्या झाडांस घालावें. जर लेंड्या झाडांच्या बुडाशीं घातल्या तर त्यापा-सून झाडांस अपकार होईल.

( ५ ) **पाल्याचें खत**—कोणत्याही झाडांच्या वाळलेल्या पाल्यापासून चांगलें खत होतें. तें अशा रीतीनें तयार करावें कीं, वाळलेलीं पानें एका खड्ड्यांत घालून त्या खड्ड्यांत पाणी सोडावें व खड्डा वाळूं न देतां ओला ठेवावा. म्हणजे तीं पानें सहा महिन्यांनीं कुजतात; आणि त्याचा कुजून भुगा झाला म्हणजे त्यांत एकचतुर्थांश नदीची बारीक वाळू घालावी. वाळू नसल्यास विटांचा चुरा करून त्यांत मिसळावा. आणि एकचतुर्थांश चांगली बारीक माती घालून नंतर हें मिश्रण कोणतेंही बीं लावण्यास योग्य होतें, व कलम म्हणजे झाडाच्या खांद्या अगर वेलांचे तुकडे लावणें झाल्यास त्या पाल्याच्या खतांत अर्धा हिश्शानें वाळू अगर विटांचा भुगा घालावा, नंतर तीं कलमें लावावीत.

( ६ ) **हिरवें खत**—ताजें झाडझुडूप अगर कोणत्याही जीवंत झाडांच्या खांद्यांपासून उत्तम खत होतें आणि तें खडकाळ जमिनीस फार चांगलें मानवतें. कांटेरी निवडुंग ( ज्याला फडेरी निवडुंग म्हणतात ) त्यापासून उत्तम खत होतें तें अशा रीतीनें तयार करावें कीं, निवडुंग तोडून आणून एक खड्डा खणून त्यांत त्याचे तुकडे तुकडे करून टाकावेत; अगर कोणच्याही ओल्या झाडाच्या खांद्याचे तुकडे तुकडे करून त्या खड्ड्यांत टाकावेत; व तो खड्डा अशा ठिकाणीं खणावा कीं, बागाइतांस पाणी जातें तो पाट खड्ड्यांत घेऊन नंतर तें पाणी बागाइतांस जावें. म्हणजे निवडुंग व खांद्या कुजून त्याचे अंश पाण्यांत जातात, आणि तें पाणी झाडांस हितकारक होतें.

( ७ ) **पातळ खत**–हें झाडांस वाळलेल्या खतापेक्षां विशेष हितकारक आहे. कारण पातळ खतापासून झाडांस आपल्या पोषणाचे पदार्थ लौकर घेतां येतात. झाड लावण्याचे वेळीं जर कुजलेलें खत न मिळेल तर वाळलेलें खत एक दिवस भिजत घालून त्याचें पाणी झाडांस घालावें, हें पातळ खत पावसाळेदिवसांत द्यावें; व दररोज जें पाणी घालतों त्यांत थोडें थोडें घालीत जावें.

( ८ ) **शेणाचें खत**–हें साधारण सर्व झाडांस चांगलें मानवतें. त्यांतून जें शेण कुजलेलें असतें तें नाजूक झाडांस म्हणजे गुलाब व तत्-जातीय झाडांस फार चांगलें आहे. विलायती तेरडा ज्याला बालसम असें म्हणतात त्यास, अगर तत्जातीय झाडांस ताजें शेणाचें अगर कुजलेल्या शेणाचें पाणी दिलें असतां त्यास फार हितकारक होतें. पातळ खत द्यावें म्हणून पुढें कित्येक ठिकाणीं लिहिलें आहे, तें शेणाचेंच पाणी द्यावें.

( ९ ) **राखेचें खत**-गोंवऱ्यांची अगर लाकडांची राख जींत केर-कचरा व पानपत्रावळी टाकितात, व ज्याला राखुंडा अगर उकीरडा म्हणतात तें खत जरी साधारण नियमापेक्षां अधिक घातलें तरी त्यापासून झाडांस अपाय होत नाहीं. हें खत विशेषेंकरून जी जमीन कठीण असेल त्या जमिनीस घालावें.

( १० ) **वाळलेलें खत**–कोणतेंही वाळलेलें खत जमिनीस घातलें तर तें चांगलें त्या जमिनींत मिसळलें पाहिजे, जर तें न मिसळतां जमिनीवर उगाच पसरलें तर त्याचा दर्प ( ज्यापासून झाडांचें पोषण होतें ) हवेंत मिसळून जातो. सबब घातलेल्या खतापासून जो फायदा व्हावयाचा तो होत नाहीं.

सोनखत, घोडयाची लीद, बकऱ्याच्या लेंडया वगैरे जीं उष्ण खतें आहेत, तीं खडकाळ जमिनीस घालूं नयेत. पक्ष्यांची विष्टा, ( ग्वायना मॅन्युअर ) हाडांचें खत, बकऱ्यांचें रक्त, वगैरे पदार्थांचीं पुष्कळ खतें होतात. हीं आपल्या देशांत मिळणें दुर्मिळ आहे व मिळालीं तर यांस पुष्कळ खर्च होतो व खर्च करून मागें सांगितलेलीं स्वल्प रीतीनें व थोडया खर्चांत मिळणारीं जीं खतें आहेत त्यापेक्षां यांत विशेष गुण आहे असें नाहीं. सोनखतासारखीं व बकऱ्याच्या लेंडीच्या खतासारखीं जीं उष्ण खतें आहेत, त्यांत ग्वायना मॅन्युअर तर फारच उष्ण आहे. हें कदाचित् कोणास मिळालें तर फारच थोडया प्रमाणानें घातलें पाहिजे, नाहीं तर हें

झाडाचें नुकसान करील. माशांचा भुकटा व करंजाची पेंड याचें उत्तम खत होतें परंतु हीं उष्ण खतांतच गणलीं गेलीं आहेत म्हणजे हीं घा- तलीं असतां पाण्याचा पुरवठा वेळचेवेळीं पुष्कळ झाला पाहिजे, तसें न झाल्यास हीं झाडांस हितकारक न होतां अपायकारक होतील.

---

## बीं पेरण्याची माती.

कोणतेंही बीं लावण्यास जमीन खताची असून भुसभुशीत असली पाहिजे. व त्या जमिनीस फार खत उपयोगी नाहीं. व पाणीही फार उपयोगी नाहीं तर अशी जमीन नदीच्या केवटयाची सांपडते, कारण त्यांत कुजलेलीं पानें वगैरे मिश्र झालेलीं असतात. तर अशा केव- टयाच्या मातींत थोडीशी वाळू घालावी, अगर विटांचा चुरा करून मि- सळावा, म्हणजे ती माती बीं लावण्यास योग्य होते. आतां नदीचा केव- टा न मिळाल्यास नवीन माती बीं लावण्यास तयार करणें झाल्यास कुज- लेल्या पानांचें खत व त्यांत निम्मे नदीची वाळू व वाळू मिळत नाहीं तेथें विटांचा चुरा करून मुतारींत अगर सांचलेल्या पाण्यांत भिजवून त्यांत दुसरी कोणती तरी माती मिसळून त्यांत बीं लावावें, अगर बाजा- रांत कोळशाचा भुगा मिळतो, त्यांत अर्ध्या वांटयानें कोणती तरी चांग- ली माती मिसळून त्यांत बीं लावावें.

---

## बीं लावण्याची कृति.

बियांमध्यें पुष्कळ जाति आहेत. कांहीं जातींचीं बियें फार कठीण असतात म्हणजे त्यांची वरील साल फार कठीण असते. ती कडकडीत उन्हांत वाळवावी लागते, अगर आधणाचे पाण्यांतून तीं बियें काढा- वीं लागतात, असें करून तें बीं जमिनींत पेरिलें म्हणजे त्यांतील साल दुभांगून कोंब लौकर बाहेर पडतो, असें न केल्यास हीं बियें

दोन दोन वर्षें जरी जमिनींत लाविलीं तरी तीं उगवत नाहींत सबब वर सांगितल्याप्रमाणें करावें लागतें. कोणचेंही बीं लावण्यास माती चिकट नसावी, काळी अगर तांबडी असली तरी चालते, परंतु त्यांत राखेचें व कुजलेलें उकिरड्याचें खत घालून ती माती मोकळी भुसभुशीत करावी आणि बीं लावण्याकरितां जमिनीचा जो वाफा तयार करावयाचा तो शेजारच्या जमिनीपेक्षां थोडा उंच असावा म्हणजे त्याला पाणी दिलें असतां त्यांतील पाणी पाझरून जाऊन त्याला बेताची ओल राहील अशा बेतानें वाफा करावा व कुंडयांत लाविलें असतां माती वर सांगितलेलीच असावी परंतु कुंड्यास भोंक पाडून कुंडयांत घातलेलें पाणी हळू हळू पाझरून जाईल अशी व्यवस्था करावी. बीं जमिनींत लावलें म्हणजे त्याजवर माती घालावयाची ती जेवढा त्या बियांचा आकार असेल तेवढीच माती वर घालावी. पेरल्यावर त्यांस पाणी द्यावयाचें तें फार जपून दिलें पाहिजे. जर एकदम पाणी ओतिलें तर बीं व माती एके ठिकाणीं जमा होते, आणि बीं नासतें, सबब पाणी थोडें थोडें जपून दिलें पाहिजे. बियांस दोनप्रहरचें कडक ऊन न लागावें अशी तजवीज ठेवावी. परंतु त्यांस सदोदीत सारखी छाया असूं देऊं नये, कारण जर छाया असल तर जे कोंब येतात त्यांस जोर नसतो. सबब त्यांस चांगला उजेड पाहिजे, परंतु कडक ऊन कमी लागावें, अशी तजवीज करावी म्हणजे झालें.

---

## कलम लावण्याची कृति.

कलम (झाडांच्या खांद्याचे तुकडे) लावणें झाल्यास त्या खांद्या अगर वेल चांगले जून झालेले पाहून तुकडे तीन पेराचे पाडावेत. व दोन शेवटाच्या पेरा जवळचा डोळा राखून तोडावा. तोडतेवेळीं फार जपून तोडावा. कारण जर त्याची साल निघाली तर तें कलम उपयोगीं नाहीं व कलमाचा तिसरा भाग पुरावयास माती म्हटली म्हणजे बारीक

रेती असावी; रेती नसेल तर विटांचा बारीक भुगा करून त्यांत लावावीं-त. नाजूक झाडांचीं कलमें लावणें झाल्यास तीं कुंडींत लावावींत परंतु ती कुंडी खालीं सांगितल्याप्रमाणें तयार करून नंतर लावावींत. कुंड्या-च्या बुडास एक किंवा दोन भोंकें बोटें जाण्याजोगतीं पाडून त्या कुंडींत खापरीचे तुकडे घालावेत. ते अशा बेतानें घालावे कीं तींत पाणी ओतिलें असतां तें पाझरून बाहेर जावें. नंतर त्यांजवर शेवाळ घालावी, शेवा-ळ नसेल तर काथ्या चांगला विंचरून घालावा. नंतर कुजलेलीं पानें ज्यांत वाळू मिश्र आहे तें खत घालावें व सुमारें चार बोटें कुंडी रिकामी आहे तोंपर्यंत कुंडी भरावी, नंतर बारीक रेती तीन बोटें घालावी. ती नसेल तर विटांचा चुरा करून घालावा. आणि त्यांत कलमें लावावींत. तीं कलमें सुमारें मधल्या पेरापर्यंत वाळूंत पुरावींत म्हणजे तीं कुजण्याची वगैरे भीति नाहीं. कलमें लावलेल्या कुंड्यावर कांचेची हांडी झांकण ठेवावी किंवा तो कुंडा भिंगांच्या पेटींत ठेवावा. ऊन अगर उष्ण हवेनें त्या कलमाचा रस वाफेच्या रूपानें जाऊं नये सबब झांकण घातलें पाहिजे. तीं कलमें मुळ्या फुटत तोंपर्यंत झांकणांत राहिलीं पाहिजेत. विशेषेंकरून हीं कलमें भाद्रपद, आश्विन व कार्तिक या तीन महिन्यांत लावावींत. कलमांस पाणी फार न घालतां थोडें थोडें घालून तीं नेहमीं ओलीं राखावींत.

---

## पिंवदी बांधणें.

पिंवदी बांधणें हें पाहिलें असतां फार सोपें काम आहे, परंतु नाजूक आहे. पिंवदी बांधणें म्हणजे एका झाडाचा डोळा दुसऱ्या तनुजातीय झाडांवर लावणें मग त्याचीं फुलें अगर फळें चांगल्या अगर वाईट जा-तीचीं असलीं तरी चिंता नाहीं. नारिंगाच्या झाडाचा डोळा लिंबाच्या झाडावर लाविता येतो; परंतु गुलाबाचा डोळा नारिंगाच्या झाडांवर ला-विता येत नाहीं; जर आपणापाशीं तांबड्या गुलाबाचें झाड आहे, व तें

झाड जर पांढऱ्या गुलाबाचें करावयाचें आहे तर पांढऱ्या गुलाबाची एक लहानशी खांदी चांगली पाहून आणावी, त्या खांदीस बहुतकरून प्रत्येक पानाखालीं डोळा असतो तो डोळा काढावा. त्या डोळ्याच्या शे- जारीं पान असतें तें तोडून टाकावें. परंतु पानाचा देंठ तोडूं नये. त्या डोळ्याची लांबी दीड किंवा दोन अंगुळें असावी व सुमारें एक गहूंभर रुंदी असावी. हा डोळा खांदीपासून चाकूनें काढावा. नंतर त्यांत थोडें त्या खांदीचें लांकूड राहतें तें फार युक्तीनें काढावें म्हणजे दोन अंगुळें साल रहातें, तो सर्व डोळा राहतो असें समजावें, तो घ्यावा आणि ज्या झाडास ( तांबड्या गुलाबास ) लावणें आहे तें झाड सुमारें जमिनीपासून दोन हात राखून वर तोडावें; व जो खुंट राहतो तो वर सुमारें आठ अंगुळें राखून खालचा डोळा सोडून चाकूनें अजमासें तीन अंगुळें एकसारखा समोर चिरावा. एक अंगूळ आडवी रेषा काढावी म्हणजे इंग्रजी मोठें टी अक्षर असतें त्याप्रमाणें त्या खुंटास चिरावें. परंतु अशा बेतानें चिरावें कीं साल मात्र चिरली जावी. आंतील लांकडास इजा होऊं नये आणि ती साल चाकूनें उचकटावी. नंतर तींत वर सांगितलेला डोळा बसवावा. आणि केळीचे सोपटानें अगर दुसऱ्या कोणत्या तरी मऊ दोरीनें बांधून टाकावा; आणि तो असा बांधावा कीं आंत वारा शिरूं देऊं नये. यास पिंवदी असें म्हणतात. ही कोणत्याही महिन्यांत केली तरी चिंता नाहीं. बहुतकरून ज्येष्ठ महिन्यापासून पौष महिन्यापर्यंत दिवस चांगले असतात म्हणजे ज्या दिवसांत हीं झाडें चांगलीं वाढत असतात ते दिवस योग्य होत. ही पिंवदी बांधण्यास एके प्रकारचा चाकू लागतो तो असा कीं, त्याचे पात्याची धार चांगली असून त्याचा शेंडा मागील बाजूस उतरता असतो. त्याची हस्तीदंती मूठ असते ती पातळ वर सांगितलेल्या चाकूच्या पात्याप्रमाणें असते; म्हणजे त्या मुठीनें कापलेली साल उचकटतां येते. जर वर सांगितल्या- प्रमाणें चाकू नसेल तर पेन करण्याचा चाकू असला तरी चालेल. परंतु

साल उचकटणें ती मात्र चाकूच्या पात्यानें उचकटूं नये; कागद कापण्याच्या हस्तीदंती चाकूनें उचकटावी.

---

## कलम बांधणें.

कलम बांधण्याचे प्रकार दोनतीन आहेत. त्यांतून एकास खोंचीचें कलम म्हणतात. त्याचा प्रकार असा कीं, कलमी झाडाची खांदी चांगली जोरदार पाहून सुमारें वीत दीड वीत तोडून आणावी, आणि सुमारें तीन बोटांएवढें जाड साधें झाड पाहून खालच्या बाजूस म्हणजे जेथें साल जाड असेल तेथें जनावराच्या शिंगानें अगर कठिणशा लांकडाच्या खुंटीनें भोंक पाडून कलमी झाडाची खांदी जितकें साधें झाडास भोंक खोल असेल तितकीच ती खांदी चहूंकडून तासून त्यांत बसवून देऊन सोपटानें घट्ट बांधावी. म्हणजे वाऱ्यानें वगैरे न हालेल अशी तजवीज ठेवावी. आणि चांगली माती घेऊन त्यांत शेण वगैरे घालून मळून घट्ट करून त्याजवर बसवून द्यावी म्हणजे हवा वगैरे आंत न जाईल असा बंदोबस्त करावा. वर सांगितलेली कृति थोडीशी कठीण आहे. कारण कोणची खांदी घ्यावी, व कोणत्या ठिकाणीं बांधावी, हें प्रत्यक्ष पाहिल्यावांचून अगर हातानें केल्यावांचून बरोबर समजणें कठीण आहे. व या प्रकारानें बांधलेलीं कलमें फार जगत नाहींत. सोपा मार्ग हा आहे कीं, कलमी झाडाजवळ साधें झाड नेऊन दोहोंची सुमारें चार चार बोटें साल तासून दोन्ही सोपटानें घट्ट बांधावींत; आणि वर सांगितलेली माती त्यावर लावावी; व साध्या झाडाचा शेंडा थोडा तोडावा, म्हणजे सुमारें एक महिन्यानें दोहोंचा एक जीव होऊन कलम तयार होतें. नंतर कलमी झाडाची खांदी थोडी थोडी तोडीत जावी. आणि कलम काढून घ्यावें व आणखी एक प्रकार असा आहे कीं, साधें झाड सुमारें बोटभर जाड असलें म्हणजे वीत दीड वीत राखून शेंडा उडवून फणीसारखें दोहों बाजूंस दोनदोन बोटें तासून त्याजवर कलमी झाडाची खांदि

येऊन बसेल अशा ठिकाणीं नेऊन ठेवावें आणि कलमी झाडाची खांदी वीत दीड वीत शेंडयाकडे राखून मागें मधोमध दोन बोटें पिंजावी आणि साधे झाडाची फणी केलेली आंत बसवून द्यावी; व सोपटानें घट्ट बांधून टाकावी आणि वर सांगितलेली माती लावावी. वाऱ्यानें वगैरे न हाले असा बंदोबस्त ठेवावा म्हणजे झालें. अशा रीतीनें कलमें लौकर तयार होऊन सुरेख मजबूद होतात. हीं कलमें अमुकच वेळीं बांधावींत असा नेयम नाहीं. कलम उतरून घेणें तें झाड व कलमी झाडांची खांदी ही चांगली रसभरीत असली म्हणजे झालें.

---

## जड दाबणें.

जड दाबणें म्हणजे खांदीस मुळ्या फुटून त्या खांदीचें नवीन झाड करणें. तें अशा रीतीनें करावें कीं जर त्या झाडाची खांदी जमिनीजवळ असली तर ती वांकवून जो भाग बळकट असेल तो चाकूनें खालच्या बाजूस त्या खांदीच्या शेंडयाकडेस एक इंचपर्यंत कापीत आणावा. परंतु असा कापावा कीं, त्या खांदीच्या अर्ध्या भागाच्या वर ती खांदी कापली जाऊं नये; व जो भाग कापला तोच जमिनीस मिळावा; आणि कापलेल्या भागांत एक लहानशी काडी घालावी. हा जमिनीस मिळाल्यावर वाळू अगर विटांचा भुगा करून त्यावर घालावा. नंतर त्यावर दगड ठेवावा. जमिनीस ओलावा नसल्यास पाणी घालावें व ती जमीन ओली राहील अशी तजवीज ठेवावी. जेथें झाडाची खांदी जमिनीस लागणार नाहीं तेथें एका कुंडयांत माती घालून तो कुंडा कशावर तरी ठेवून वर सांगितल्याप्रमाणें करावें.

---

## झाडें खच्ची करणें व बदलणें.

कांहीं फळझाडांस व फुलझाडांस खच्ची करावें लागतें. परंतु त्यांची वेळ पाहून करावें लागतें. ज्या खांद्या लांब गेल्या असतील त्या तोडिल्या

पाहिजेत. झाडांस फुलांचा अगर फळांचा बार येऊन गेल्यावर पानें वगैरे गळूं लागतात. त्या वेळींच झाडें खच्ची केलीं पाहिजेत. त्याजला अंकुर फुटूं लागल्यावर खच्ची केलीं असतां त्यांचा रस बाहेर फार जाऊन तीं झाडें अशक्त होतात. झाडें जोरानें वाढत असलीं तर त्यांचे खांद्यांचे शेंडे थोडे वरवर उडवावेत. झाडें बदलण्याचे दिवस पाहून तीं बदललीं पाहिजेत. म्हणजे ज्या वेळेस झाडें वाढत नसतात व त्यांचीं पानें वगैरे गळत असतात, व हवाही ज्या वेळेस निरभ्र असते त्या वेळेस बदलावींत. झाडें बदलतेवेळीं त्यांच्या मुळ्या वगैरे दुखवल्या असल्यास साफ कापून टाकाव्यात. व जसा मुळ्यांचा आकार असेल, तशींच तीं दुसऱ्या खड्ड्यांत ठेवावींत. म्हणजे मुळ्या वांकड्यातिकड्या होऊं देऊं नयेत, व बदलते वेळीं मुळ्यांपाशीं कोणतेंही खत घालूं नये. चांगली माती मात्र घालावी. नंतर खत माती मिसळून खड्डा भरीत यावें.

---

## झाडांस पाणी.

कोणत्याही झाडांस अमुकच वेळीं आमक्याच प्रमाणानें पाणी दिलें पाहिजे असा बरोबर नियम करितां येत नाहीं. एखाद्या जमिनीस पाणी घातल्याबरोबर तें पाझरून जातें, एखाद्या ठिकाणीं जात नाहीं परंतु ज्या ठिकाणीं पाझरून जातें त्या ठिकाणीं झाडें लौकर होतात. व ज्या ठिकाणीं पाण्याची गरज फार नाहीं व पाणी घातलें असतां लौकर नाहींसें होत नाहीं अशी जागा झाडांस उपयोगी नाहीं. नवीन झाड लाविलें असतां त्यास वारंवार पाणी दिलें पाहिजे परंतु एकदम फार देऊं नये. थोडें थोडें दिलें पाहिजे. जीं साधारण मोठीं झाडें ( गुलाब वगैरे तत्जातीय ) आहेत, व ज्यांणीं चांगल्या मुळ्या धरिल्या आहेत, त्यांस थोडें थोडें पाणी दररोज देऊन उपयोग नाहीं. कारण थोडें पाणी घातलें तर सूर्याच्या उष्णतेनें त्याची वाफ होऊन जाते. आणि मुळ्यांस पाणी मिळत नाहीं, सबब अशा मोठ्या झाडांस चार दिवसांनीं एक वेळच

पाणी द्यावें, परंतु तें पुष्कळ द्यावें. जीं झाडें कुंडयांत वगैरे लाविलेलीं आहेत त्यांस जमिनींत लावलेल्यांपेक्षां पाणी वरचेवर दिलें पाहिजे. झाडांस पाणी पुष्कळ दिलें तर तें पाझरून जात नाहीं, तसेंच राहतें व तें झाडांस अनहितकारक होतें. झाडांस पाणी द्यावयाचें तें संध्याकाळीं द्यावें. परंतु तडयावारा ( पूर्वेकडील वारा ) असल्यास सकाळीं द्यावें.

---

## किड्यांविषयीं.

एके प्रकारचे पांढरे किडे कधीं कधीं झाडांवर पडतात, त्यांना वारंवार पिचकारीनें धुवून टाकिलें असतां ते नाहींसे होतात. गुलाबांच्या झाडांस कीड लागते म्हणजे किडा झाडांस भोंक पाडतो आणि तें झाड मरूं लागतें तर रॉकआइल तेलाचे त्या भोंकांत एक दोन थेंब सोडिले असतां ती कीड मरून जाते. हें तेल फार घालूं नये. झाडांच्या पानांच्या मागें बारीक काळे किडे पडतात, त्यापासून झाडांचीं पानें गळूं लागतात, तर थोडें राकेल घेऊन त्यांत पुष्कळ पाणी घालून त्या पाण्यांत साबण घालावा, आणि त्या पाण्यानें त्यांचीं पानें धुवून टाकावींत; म्हणजे ती कीड नाहींशी होते. गुलाबाच्या पानांवर कधीं कधीं बारीक कीड पडून भोंकें पडतात, तर त्याजवर गंधकाची भुकणी फेंकावी आणि पिचकारीनें पानें धुवून टाकावींत, अगर तंबाखूच्या पाण्यानें धुवून टाकावींत. कधीं कधीं गुलाबाच्या झाडांच्या खोडांस गोचिडासारखा किडा पडत असतो, त्याजपासून झाड मरतें, तर ते किडे काठीनें काढून टाकून शेणमातीनें तें खोड सारवून महिना पंधरा दिवस ठेवावें म्हणजे सर्व किडे मरून झाड पहिल्यासारखें चांगलें होतें.

---

# भाजीपाल्यांची माहिती.

## विलायती भाजीपाला.

### आस्पेरेगस.

याचें बीं पावसाळा लागण्याच्या सुमारास खतावलेल्या जाग्यांत पातळ पेरावें, व याचें झाड आश्विनमासीं मोठें होऊन मरूं लागतें तेव्हां त्याचे खालीं बारीक बारीक मुळ्या असतात त्या काढून पाण्याच्या आश्रयास सावलींत पुरून ठेवाव्यात, नंतर त्या पाऊस पडण्याचे सुमारास दुसऱ्या खतावलेल्या जागेंत लावाव्यात; म्हणजे त्यास पांढरे बांबूच्या कोंबासारखे कोंब येऊं लागतात. ह्या कोंबांस थोडा वास असतो व हे रुचकर असतात. हे कोंब साहेब लोक खातात.

---

### आर्टिचोक.

याच्या दोन जाति आहेत. एक जेरूसलेम आर्टिचोक व दुसरा फुलाचा आर्टिचोक. जेरूसलेम आर्टिचोक ही फार उत्तम व पौष्टिक भाजी आहे. हिच्या आल्यासारख्या मुळ्या असतात, त्याची दुधांत उकडून भाजी करितात. याच्या मुळ्या भाद्रपदापासून कार्तिकापर्यंत रहातात, नंतर त्या कुजूं लागतात. त्या वेळीं त्या पाण्याच्या आश्रयास सांवलींत पुरून ठेवाव्यात, नंतर पाऊस पडण्याच्या सुमारास दीडदीड फुटाच्या अंतरावर चर करून त्यांस दीडदीड फुटाच्या अंतरावर जमिनींत सुमोरे तीन इंच खोल लावाव्यात व पाऊस नसला म्हणजे त्यांस दहा दिवसांनीं पाणी द्यावें म्हणजे त्या भाद्रपदमासीं खाण्यासारख्या होतात. त्या एकदम खणूं नयेत जशा लागतील तशा खणाव्या. याचें रोप जसें जसें मोठें होतें तसतसें त्याच्या बाजूस बटाटयाप्रमाणें माती चढवीत जावी. नंतर चार महिन्यांनीं त्यास पिवळीं फुलें येतात. फुलेंही सुकून त्यांचीं झाडें सुकलीं म्हणजे त्याच्या मुळ्या काढून घ्याव्या. त्या मुळ्या बीं लावून तयार करण्यापेक्षां मुळ्याच लावून खाण्याकारितां लवकर तयार होतात.

---

## फुलाचा आर्टिचोक.

ह्याचीं पानें फार सुंदर असतात. याचें बीं पावसाळा लागण्याचे सुमारास खतावलेल्या जमिनींत पेरावें. याचें झाड कांहींसें तिळाच्या झाडासारखें असतें व याचीं फुलें तिळासारखींच पिवळीं असतात. यास पाणी चार चार दिवसांनीं द्यावें, म्हणजे यास एक वर्षानंतर फुलें येतात, तीं उकडून लोण्याबरोबर खातात. यांस फुलें आलीं म्हणजे हें झाड फारच शोभिवंत दिसतें.

---

## एग्प्लँन्ट ( वांगीं. )



यास ( वांगीं ) असें म्हणतात. याचीं झाडें युरोपखंडांत शोभेकरितां लावितात; परंतु आपले देशांत बहुतकरून सर्व जातींचे लोकांस याची भाजीच आवडते. याच्या पुष्कळ जाति असतात, आणि याचें फळ जातीप्रमाणें लहान मोठें असतें. त्याचे रंगही निरनिराळ्या प्रकारचे असतात. कांहीं जांभळीं व कांहीं करड्या रंगाचीं असतात. सफेत जातीचीं वांगीं हात दीड हात लांब असतात व तीं फार सुरेख दिसतात. जांभळ्या व हिरव्या वांग्याचा काळ्या वांग्याइतका खप नसतो. काळ्या वांग्यास बंगाली वांगीं असें म्हणतात. याची लावण्याची कृति विशेष कठिण नाहीं. यास चांगली खतावलेली जमीन असली म्हणजे हीं चांगलीं होतात. याचें रोप वीत सवा वीत वाढलें म्हणजे खतावलेल्या जमिनींत एकेक हाताच्या अंतरानें लावावें. पाऊस असेल त्यावेळेस

त्यास पाण्याची जरूर नाहीं, पाऊस नसेल त्या वेळेस तीनतीन दिवसांनीं पाणी देत जावें म्हणजे हीं तयार होतात.

---

## फ्रेंचबिन्स ( फरसबी )



यास फरसबी असे म्हणतात. याच्या जाति पुष्कळ आहेत. याचें बीं पावसाळा लागण्याचे सुमारास खतावलेल्या जमिनींत ओळीनें सहासहा बोटांच्या अंतरानें लावितात. कांहींचे लांब वेल वाढतात व कांहीं ठेंगणे लहान वाढतात. हीं झाडें सुमारे वीतभर वाढलीं म्हणजे वर चढण्याकरितां त्याच्या बाजूस काड्या पुराव्या. हें बीं एकदम पेरूं नये. १५।१५ दिवसांनीं थोडें थोडें पेरीत जावें म्हणजे सदोदित ओल्या शेंगा मिळतात. हें बीं लावल्यानंतर दोन महिन्यांच्या आंत यास बार येऊं लागतो. याच्या शेंगाची भाजी देशी घेवड्यापेक्षां विशेष रुचकर असते. याच्या वेलास कडक ऊन लागणार नाहीं अशा ठिकाणीं हे लाविले असतां चांगले होतात.

---

## डबल बिन्स ( डबलबी )

हा फ्रेंचबिन्सच्या जातींपैकीं घेवड्यासारखा वाढणारा एक वेल आहे. याचे दाणे मोठे व चपटे असून त्यावर तांबड्या रंगाचे ठिपके असतात. याच्या शेंगा हिरव्या असतात. याचें बीं पाऊस पडण्याच्या सुमारास लावितात व तीनचार महिन्यांनीं यास शेंगा येतात. याच्या दाण्याची उसळ

करतात. इतर घेवड्यांप्रमाणें याच्या शेंगाची भाजी होत नाहीं. यास बार हिंवाळ्यांत येतो. याचे वेल चढण्यासाठीं काठ्या लावाव्या लागतात.

---

## बीट.



हें कांहींसें मुळ्याच्या आकाराप्रमाणेंच आहे. याच्या लागवडीस जमीन खोल खणावी लागते, नंतर त्यांत उकिरड्याचें किंवा सोनखत घालून जमीन पोकळ करावी लागते आणि वाफे बांधून अगर सऱ्या करून त्यांत वितीवितीच्या अंतरावर एकेक बी लावावें. यांत ३ जाति आहेत. एक वाटोळें तांबडें, एक लांब तांबडें व तिसरें पिवळें. याचें रोप करून लावण्यापेक्षां जागच्या जागेवर वाढूं दिलें तर चांगलें होतें. हें लावण्याचे दिवस म्हटले म्हणजे पावसाचे चार महिन्यांत कोणच्याही वेळेस लाविलें तरी चिंता नाहीं. याला रेतीची भुसभुशीत माती चांगली मानवते. हें फार गोड असतें. युरोपांत याची साखर करितात. पाऊस नसेल तेव्हां आठवड्यांतून एक वेळ यास पाणी घातलें पाहिजे व पाण्यांत थोडें मुतारीचें खत मिसळलें असतां यास हितकारक होतें. यावर केव्हां केव्हां किडा पडतो. त्यास मीठ पाण्यांत घालून तें पाणी घालावें. याला खारेंपाणी मधून मधून दिलें असतां हितकारक होतें. कारण याची मूळची उत्पत्ति समुद्रकिनारीं आहे. याला खाऱ्या माशाचें खतही मानवतें.

## ब्रोकोली.

ब्रोकोली या देशांत चांगली होते. परंतु जमिनीची खोल मशागत म्हणजे सुमारें हातभर खोल जमीन खणावी, आणि त्यांत पुष्कळ खत घालावें. तें खत म्हणाल तर गुरांचें शेण अगर जें सोनखत पुष्कळ दिवसांचें असतें तें उत्तम. या ब्रोकोलीच्या अनेक जाति आहेत. त्यांतून पांढऱ्या जातीची ब्रोकोली चांगली. जांभळे जातीची ब्रोकोली असते, ती या देशांत चांगली होत नाहीं. चांगल्या जमिनींत हें पातळ बीं पेरून सुमारें चारसहा बोटें उंच रोप झाल्यावर जेथें आपणास लावावयाचें असेल, तेथें सुमारें दीड हाताचे अंतरानें लावावें. हें बीं कोणत्याही वेळीं पर्जन्यकाळीं पेरिलें तरी चिंता नाहीं. पावसाळा लागण्याचे पूर्वीं बीं पेरिलें असतां त्याजवर किडा पडतो, सबब श्रावण महिन्याचे सुमारास बीं पेरावें म्हणजे किडीपासून उपद्रव कमी होतो. याला पाणी तिसरे दिवशीं देत जावें. ह्याचें फूल कालिफ्लावरसारखें असतें व ह्याची भाजी करितात.

याचें रोप कायम लावण्यापूर्वीं तीनदां बदलावें म्हणजे याला मोठें कालिफ्लावरासारखें फूल येतें.

---

## ब्रुसेल्सप्राउट.

याचें बीं अर्धा पावसाळा झाल्यावर खतावलेल्या जाग्यांत पातळ पेरावें. आणि त्याचें रोप चारसहा बोटें उंच झालें म्हणजे मातीसुद्धां उपटून जेथें जमीन तयार केली असेल तेथें हाताचें अंतरावर लावावें. याला शेणाचें खत मानवतें, व याजपेक्षां सोनखत मिळालें असतां फार चांगलें. हें झाड वीत दीड वीत उंच झालें म्हणजे यास खांद्या फुटतात. व त्या खांद्यांना कोबीसारखे लहान गड्डे येतात; व त्याची कोबीसारखी भाजी करितात.

---

## कोबी ( क्याबेज. )



कोबीचे गड्डे आपण हिंवाळे व उन्हाळे दिवसांत बाजारांत पाहतो. यावरून असे अनुमान करितां येतें कीं, कोबी या देशांत करणें कठीण नाहीं. हाळी ( लौकर ) आणि गरी ( उशीरां ) अशा कोबीच्या दोन जाति आहेत. त्या जातीचें बीं एकएक महिन्याचे अंतरानें म्हणजे ज्येष्ठापासून कार्तिकापर्यंत कोणत्याही महिन्यांत खतावलेल्या जमिनींत पेरावें. पहिल्यानें म्हणजे ज्येष्ठांत जें बीं पेरितात, त्यावर पुष्कळ किडे पडण्याचा संभव असतो. परंतु वेळच्यावेळा पाऊस पडावा तो तसा पडला असतां किडे होत नाहींत. कीड पडली असतां मीठ घालून खारेंपाणी झाडावर शिंपावें, परंतु ती जमीन मूळचीच खारी नसेल तर घालावें; अगर त्या कोबीच्या झाडांवर राख फेंकावी, म्हणजे कीड कमी होते. कोबीस जमीन खताची पाहिजे. गुराचें शेण हें खत चांगलें, व सोनखत घातलें तर फारच चांगलें. परंतु पाणी मात्र विशेष पाहिजे; रोप उपटते वेळीं त्याबरोबर माती असावी, सबब बीं पेरते वेळीं पातळ पेरिलें म्हणजे रोप मातीसुद्धां काढितां येतें. आणि तें रोप हात दीड हाताचे अंतरावर एकेक लावावें, व रोप लावते वेळीं हिंगाचें पाणी करून त्यांत रोपांचीं बुडें बुडवून लावावींत. म्हणजे ओटा ( पांढरा किडा ) जमिनींत असतो त्याचा उपद्रव विशेष होत नाहीं.

कोबीस जेथें थंड हवा असते तेथें बीं येतें. कोबीचा गड्डा कापून घेतल्यानंतर जमिनींत राहिलेल्या दांड्यांस पाणी दिलें असतां त्यावर

पिलें फुटतात. हीं निरनिराळीं करून लाविलीं असतां त्यांस गड्डे येतात. परंतु हे गड्डे लहान असतात.

कोबी व कलिफ्लावर यांस चांगली खतावलेली जमीन मिळाली म्हणजे फार जोरानें वाढतात, यामुळें कोबीचे गड्डे वळत नाहींत व कलिफ्लावर यांस फुलें येत नाहींत तर अशा वेळीं तीं झाडें त्या जागेवरून दुसरे ठिकाणीं बदलावींत म्हणजे त्याचा जोर कमी होऊन गड्डे व फुलें येतात.

## क्यापसिकम ( भोपळीमिरची )



जिला आपल्या इकडे भोपळीमिरची असें म्हणतात. तिचें रोप वाफ्यांत सुमारें चारसहा बोटें उंच झालें म्हणजे जेथें लावणें असेल तेथें हें रोप एक हाताचे अंतरानें लावावें. आणि मोठी मिरची यावी अशी इच्छा असेल तर, जीं पहिल्यानें फुलें येतील तीं तोडून टाकावींत, व त्या झाडाची एक जोरदार खांदी असेल ती ठेवावी; आणि बाकीच्या खांद्या खच्ची कराव्यात; व फूट वरचेवर तोडीत असावी. कुजलेलें शेण अगर दुसरें कोणतेंही खत, पाण्यांत थोडें घालून तें पाणी आठवड्यांतून एक वेळ पाऊस नसेल तेव्हां द्यावें; परंतु पाणी फारच वरचेवर देत गेलें तर झाडांच्या मुळ्या कुजतात आणि झाडें मरतात.

## क्यारेट ( गाजरें )

यांला गाजरें असें म्हणतात. गाजरें या दक्षिण देशांत जेथें पाऊस १५।१६ इंचांवर पडत नाहीं तेथें चांगलीं होतात. पावसाळ्यांत गाजरें पेरिल्यापेक्षां हिंवाळ्यांत गाजराचें बीं पेरावें, म्हणजे त्या गाजरांस गोडी विशेष येते. जमिनीस खत घालून लागलेंच गाजराचें बीं पेरण्यापेक्षां पूर्वीं एक वर्ष जमीन खतावलेली असेल, ती जमीन नांगरून अगर खणून तयार करून तींत गाजरें पेरिलीं असतां उत्तम गाजरें येतात. गाजराचें बीं ओळीनें पेरावें; ओळी एकमेकांपासून सुमारें आठरहा अंगुळांवर असव्यात. तें बीं उगवल्यावर पातळ करावें, म्हणजे एकेक झाड दोन दोन बोटाचे अंतरावर ठेवावें. पावसाळ्यांत पाऊस वेळचे वेळेस न पडल्यास थोडें पाणी द्यावें. परंतु हिंवाळ्यांत आठवड्यांतून एक दिवस पुष्कळ पाणी द्यावें.

---

## कालिफ्लावर ( फुलवर )



ही भाजी फार नाजूक आहे. या देशांत ही चांगली होते. बागाईताच्या जमिनी साधारण खतावलेल्या असतात, परंतु तेवढे खतानें हीं झाडें चांगलीं होत नाहींत व याचें रोप लावतेवेळीं खत पुष्कळ घालून लाविलें असतां झाड चांगलें होतें; म्हणजे यास फूल मोठें येतें. परंतु जी जमीन एक वर्षाचे अगोदर गुरांचें शेण, उकिरडा व राख वगैरे घालून चांगली मशागत करून म्हणजे जमीन चांगली हात दीड हात खोल

म्हणून तींत गवत वगैरे उगवूं न देतां तयार करून तींत हें रोप लावते वेळींही आणखी खत घालून लाविलें असतां झाड मोठें होतें व फूल- ही मोठें येतें. याचें बीं ज्येष्ठापासून श्रावण अखेरपर्यंत कोणतेही वेळीं पेरिलें असतां चिंता नाहीं.

आतां बीं पेरण्याकरितां वाफा तयार करण्यास खत घालावयाचें तें कुजलेलें असेल तें घालावें. उष्ण खतें ( सोनखत, घोड्याची लीद ) वगैरे घालूं नयेत; व बीं वाफ्यांत पेरिते वेळीं ओळीनें पेरावें, त्या ओळी आठ अगर दहा अंगुळांचे अंतरानें असाव्यात, व बीं पातळ पेरावें व तें रोप सहा अगर आठ बोटें उंच झालें म्हणजे जपून मातीसुद्धां उप- टावें आणि जी जमीन रोप लावण्यास तयार केली असेल, तेथें सुमारें दीडदीड हाताचे अंतरानें एकेक रोप लावावें; तें रोप चांगल्या मुळ्या धरून वाढूं लागलें म्हणजे एक पाण्याचे पालटा आड पातळ खत द्यावें; पातळ खताविषयीं मागें सांगितलें आहे तें पहावें.

---

## सेलरी.



याचें बीं पाऊस पडण्याचे सुमारास खतावलेल्या जाग्यांत पेरावें. याला उगवण्यास वीसबावीस दिवस लागतात. याचें रोप चारसहा बोटें उंच

झालें म्हणजे खतावलेल्या जमिनींत खोल सऱ्या काढून त्यांत विंतीविंतीचे अंतरावर एकेक झाड सरींत लावावें. तीं झाडें चांगलीं जोरानें वाढूं लागल्यावर त्यांचे बुडांस थोडें वाळलेलें गवत गुंडाळून दोन्हीं सऱ्यांचे मातीनें पानाचे देंठापर्यंत झांकून टाकावींत, म्हणजे तीं खणल्यावर बुड व पानाचे दांडे पांढरे निघतात; त्यास एक प्रकारचा वास येतो, परंतु जेथें पर्जन्य फार असेल तेथें सरींत न लावितां वाफ्यांत लावावींत. आणि वर सांगितल्याप्रमाणें देंठापर्यंत भर घालावी. अशीं वाफ्यांत लाविलीं असतां पावसाचे पाणी सांचून झाडें खराब होणार नाहींत. ह्याची भाजी करीत नाहींत; परंतु वास येतो सबब हिरवीच खातात.

---

## क्रेस ( आळीव. )

क्रेस " आळीव, " याचें बीं पावसाळा लागण्याचे सुमारास खतावलेल्या जमिनींत पेरावें. हें बीं आठआठ दिवसांनीं थोडें पेरीत जावें. हें चारसहा बोटें उंच झालें म्हणजे कोंवळेपणींच याला लोक खातात. याला एक प्रकारचा वास येतो.

---

## वाटर क्रेस.

ही पाण्यांत उगवणारी आळिवाची जात आहे. हें या ठिकाणीं डोंगराळ देशांत पाण्याच्या आसऱ्यास सांपडतें. याची लागवड करणें झाल्यास याचीं झाडें आणून बागाइतास ज्या वाटेनें पाणी जातें, त्याचे शेजारीं एक लहानसा खड्डा खणून पाटाचें पाणी खड्यांत जाऊन मिळे अशी तजवीज ठेवावी. ह्याचे आंगीं अन्नपचन करण्याची शक्ति आहे. हें हिरवेंच खातात.

---

## ककंबर ( कांकडी )



कांकडीच्या पुष्कळ जाति आहेत. त्याचीं फळें लहानमोठीं असतात. त्यांतून कितीएक जातींच्या कांकडया एका मनुष्याचें ओझें होईल इतक्या मोठ्या असतात व कितीएक अगदीं बारीक असतात. आपल्या इकडे खिरे व लहान जातीच्या कांकड्या सर्व वर्षभर होतात. विलायती व देशी कांकड्यांमध्यें एवढाच फरक आहे कीं, विलायती बियांपासून जीं फळें येतात तीं आपल्या स्वदेशीय फळांपेक्षां मऊ असतात. कांकडीचे वेल साधारण जमिनींत होतात; परंतु उत्तम जमिनींत त्यास चांगल्या कांकडया येतात. पाऊस नसला म्हणजे यास पाणी आठवडयांतून तीनदां द्यावें. कांहीं कांकडया सफेत पांढऱ्या असतात व कांहीं काळसर रंगाच्या असतात. या जमिनीवर वाढूं दिल्यापेक्षां मांडवावर वेल चढविले असतां पुष्कळ लागतात; त्यांतच एक टरकांकडी म्हणून जात आहे, ती चांगली हात दीडहात लांब असते व आंत पोकळ असते, वर लिहिलेल्या कांकडयासारखी गुळगुळीत नसते, रेघा असतात व याची रुचि निराळी आहे. हिची भाजी करितात व हिरवीही खातात. हिची लागवड हिंवाळ्यांत नदी किनाऱ्यास ज्या खरबुजाच्या वाडया असतात त्यांत करितात.

---

## गोर्डम्.

"यांत पांढरा व काळा भोंपळा आणि दोडके हीं येतात." याची लागवड करणें सर्वांस माहिती आहे, सबब याविषयीं येथें सांगत नाहीं. याला कांहीं पुरुषजातीचीं व कांहीं स्त्रीजातीचीं फुलें येतात. यांचा संयोग पांखराकडून बहुधा झाला जातो, व कदाचित् न झाल्यास पुरुष जातीचे फुलास एक मध्यें तुरा असतो, त्यास बारीक बारीक हळदीसारखा पदार्थ असतो, तो हातानें अगर कुंचलीनें घेऊन स्त्रीजातीच्या फुलास लावावा, म्हणजे तें फळ वाढतें; व त्या फळास कडक ऊन न लागेल अशी तजवीज ठेवावी.

---

## नोलकोल.



याच्या दोनतीन जाति आहेत. जांभळा, पांढरा व हिरवा.

ही भाजी या देशांत बहुतकरून बारमहा होते. याचें बीं खतावलेल्या जागेंत पातळ पेरून, त्याचें रोप चारसहा बोटें उंच झाल्यानंतर दीडदीड वितीच्या अंतरानें खतावलेल्या जागेंत लावावें. हे नोलकोल लाविल्यापासून अडीचतीन महिन्यांनीं तयार होतात. पावसाचे आरंभीं बीं

पेरिलें असतां, त्याजवर कीड पडण्याचा संभव असतो, सबब अर्धा पाव-साळा झाल्यावर बीं पेरावें.

---

## लेटीस (सालिट)



याच्या दोन जाति आहेत. क्याबेज लेटीस व दुसरें कास लेटीस. क्याबेज लेटीस याचे गड्डे शुगरलोप कोबीसारखे होतात. ते हिरवेपणींच खातात. ही भाजी पाचक आहे. याचा रंग तांबडा, पांढरा, काळा व पिंवळा असा असतो. याचें बीं खतावलेल्या जागेंत पेरून रोप चारसहा बोटें उंच झालें म्हणजे दीडदीड वितीच्या अंतरावर एकेक लावावें, व यास आठवड्यांतून दोन वेळ पाणी द्यावें; लावल्यापासून हे दोन महिन्यांनीं तयार होतात.

---

## मेलान (शेंदाडें)

याची लावण्याची कृति वगैरे आपल्या स्वदेशीय शेंदाडा-प्रमाणेंच आहे; परंतु विलायती बियांपासून जीं फळें यतात, तीं कांहीं मोठीं असतात, व त्यांवर तऱ्हेतऱ्हेच्या रेषा असतात; व त्यांच्या आंतील रंग आपल्या शेंदाडापेक्षां कांहीं निराळा असतो.

---

## मस्टार्ड (मोहऱ्या)

याच्या दोन जाति आहेत. एक तांबडें व दुसरें पांढरें. दोहोंची रुचि सारखीच आहे. हें चांगलें खतावलेल्या जाग्यांत पेरावें. याची मेथीसारखी भाजी होते; परंतु साहेबलोक कोंवळी असतांना उपटून हिरवीच खातात. ही फार पाचक आहे, याला पाणी आठवड्यांतून दोन वेळ द्यावें.

---

## अनियन (कांदे)



कांदे हे सर्व देशांत होतात. हिरवे कांदे पाहिजे असल्यास प्रत्येक महिन्यांतून दोन वेळ थोडें थोडें बीं खतावलेल्या जाग्यांत पेरावें, म्हणजे बारमहा हिरवे कांदे सांपडतात. उन्हाळे दिवसांत उन्हाचा कडाखा फार न लागेल अशी तजवीज ठेवावी म्हणजे झालें. वाळलेले कांदे पाहिजे असल्यास चांगल्या खतावलेल्या वाफ्यांत भाद्रपदमासीं बीं पेरावें आणि सुमारें चारसहा बोटें रोप उंच आल्यावर आठ बोटांचे अंतरावर एकेक कांद्याचें रोप लावावें. याला पाटाचें पाणी देतां यावें अशी तजवीज ठेवावी. कांद्याचें बीं पाहिजे असल्यास जुनें कांदे वितीचे अंतरावर लावावेत. याला सोनखत फार चांगलें मानवतें, अथवा जुनें कुजलेलें खत जमिनींत घालून कांदे लाविले असतां चालतात.

---

## पार्स्नीप.

याचें बीं पातळ बारीक पंखासारखें असतें. हें खोल खतावलेल्या जागेंत लावावें. याचें रोप न करितां जागा तयार केली असेल तेथेंच लावलें असतां चांगलें येतें. याला गाजरासारखा खालीं मुळा येतो, परंतु याचा स्वाद गाजरापेक्षां व बिटापेक्षां निराळा असतो. पाऊस नसेल तेव्हां याला आठवड्यांतून दोनदां पाणी द्यावें.

---

## पार्स्ली.

याचें बीं खतावलेल्या जाग्यांत पेरावें. यास उगवण्यास वीस बावीस दिवस लागतात. याचें रोप चारसहा बोटें उंच झालें म्हणजे खतावलेल्या जाग्यांत लावावें. याचा उपयोग कोथिंबिरीसारखा करितात. पार्स्ली बारमहा राहते. हें झाड न उपटतां याचीं पानें काढून घेतात. याच्या दोन जाति आहेत. सिंगल व डबल. डबल जातीच्या पार्स्लीच्या पानांच्या सुरकुत्या पडलेल्या असतात. याचा खप बाजारांत विशेष असतो.

---

## पम्किन.

याच्या दोनतीन जाति आहेत. एक हिरवा असतो, दुसरा तांबडा व तिसरा पिंवळा असतो. याची लावण्याची कृति देशी तांबड्या भोंपळ्यासारखीच आहे. याचें बीं वैशाख व ज्येष्ठ या महिन्यांत लावावें. याचे वेल वाढतात. पम्किन याचें फळ आपल्या काशीफळापेक्षां मोठें असतें व याचील विशेष गोड असून मृदु असतें व बियाचा आकारही आपल्या काळ्या भोंपळ्याच्या बियापेक्षां निराळा आहे. याचें बीं चापटें असून मोठें असतें.

---

## पी ( वाटाणे. )



वाटाणे ही भाजी सर्व जातींचे लोकांस प्रियकर आहे; आणि बहुतेक सर्व देशांत याची लागवड होते. यास जमीन खतावलेली पाहिजे, व ज्या जमिनींत चुन्याचा अंश असतो ती याला विशेष मानवते. ज्या जमिनींत चुन्याचा अंश नसेल तेथें हाडाच्या भुग्याचें अगर चुन्याचें खरीप असेल तें घालावें. यांस पूर्वीचे पिकास खत घातलेली जमीन असावी. जर अशी नसेल तर जुनें कुजलेलें खत घालावें. हेंही न मिळेल तर पातळ खत घालावें. वाटाण्याचें बीं दोन बोटें खोल लावावें; व त्याच्या ओळी हाताच्या अंतरावर लावाव्यात व तें बीं ओळींत चार बोटांचे अंतरावर असावें. याच्या दोन जाति आहेत. हळी व एक गरी. वाटाण्याचे वेल सुमारें आठ अंगुळें उंच झाल्यावर त्या दोहों ओळींमध्यें काड्या वेल वर जाण्यास लावाव्यात, याला एक प्रकारचा पांढरा रोग पडतो, तो बहुधा पाऊस नसेल त्या वेळीं पडतो, व धुक्याचे योगानें ही हा रोग पडतो. जर तो रोग पडला, तर त्या झाडावर पुष्कळ पाणी शिंपावें, म्हणजे तो रोग कांहीं कमी होतो. याला चार दिवसांनीं एक वेळ पाणी द्यावें.

---

## रॅडिश ( मुळे.)



विलायती मुळे आपल्या मुळ्यांपेक्षां निराळे असतात, त्यांचा रंग तांबूस व पांढरा असतो. व त्यांपैकीं कांहींचा आकार लहान असून लांबट असतो, व हे पेरल्यापासून पंधरावीस दिवसांनीं तयार होतात. याची लागवड करणें सोपी आहे. ती अशी कीं, जमीन खणून खत घालून तयार करावी, आणि बीं पातळ पातळ पेरून पाणी रोज नेमस्त द्यावें. हें पावसाळ्याच्या आरंभापासून तों हिंवाळ्यापर्यंत कोणत्याही वेळीं लाविलें असतां चालेल. परंतु रोज पाणी दिलें असतां, मुळे चांगले अरवार होतात. याचें रोप करून बदलूं नये, व अशा ठिकाणीं बीं पेरावें कीं, त्यांस सर्व दिवस कडक ऊन लागूं नये.

याचें बीं पंधरापंधरा दिवसांनीं थोडथोडें लावावें, म्हणजे सदोदित कोंवळे मुळे खाण्यास मिळतात.

---

## स्पिनॅच.

ही एकप्रकारची भाजी आहे. हिचा कोंवळा पाला खातात. ही भाजी थंडीचे दिवसांत चांगली होते. याची लागवड करणें फार सोपी आहे. याचें बीं खतावलेल्या वाफ्यांत पेरावें, व दाट झालें असतां मधून मधून झाडें कापून काढावींत; आणि एकेक झाड सहासहा बोटाचे अंतरानें ठेवावें; आणि मधून मधून पातळ खत द्यावें म्हणजे झालें.

---

## टोमाटो ( बेलवांगें. )



ह्याचीं फळें पिकलेलीं खाल्लीं असतां पानथरीचा उपद्रव कमी होतो. व याच्या अंगीं हगवण बंद करण्याचा गुण आहे, व पाचक शक्तिही आहे. हीं झाडें कोणच्याही चांगल्या जमिनींत बारमहा होतात. याचें रोप करून दीड दीड हाताचे अंतरानें लावावें. पाऊस नसेल तेव्हां आठवड्यांतून दोनवेळ पाणी द्यावें. व मधून मधून पातळ खत द्यावें. व तें वीतभर उंच झालें म्हणजे काठ्या पुरून त्यावर खांद्या चढवाव्यात. उन्हाळ्यांत लावणें असेल, तर कडक ऊन न पडेल अशा ठिकाणीं लावावें.

यांचीं पिकलेलीं फळें तशींच खातात व हिरव्या फळांची भाजी वांग्याच्या भाजी सारखी होते. याच्या दोनचार जाति आहेत. एकाचें फळ वाटोळें असून लाल असतें, दुसऱ्याचें फळ लांबोडें असून पिंवळट रंगाचें असतें व तिसरें लहान बोरा एवढें असतें.

## टरनीप [ सलगम. ]



ही भाजी या देशांत हिंवाळ्यांत होते. याचा आकार कांहींसा नोलकोलासारखा आहे. यास किडीचा उपद्रव फार होतो, करितां पावसाळा संपत आला म्हणजे खतावलेल्या जागेंत आठआठ बोटांचे अंतरानें बीं लावावें. याचें रोप करून बदलूं नये. एकच ठिकाणीं एकापेक्षां अधिक कोंब आले असतां त्यांत चांगला असेल तो ठेवून बाकीचे उपटून टाकावेत. त्याजवर कीड पडली असतां राख फेंकावी आणि पाणी झारीनें घालावें, म्हणजे कीड कमी होते. हें लावल्यापासून तीन महिन्यांनीं तयार होतें.

यांत दोन जाति आहेत. तांबडा आणि पांढरा. दोघांची रुचि सारखीच असते.

---

## व्हेजीटेबलमारो.

ही एक भोंपळ्याची जात आहे. याची लावण्याची कृति काशीफळ अगर काळ्या भोंपळ्याप्रमाणेंच आहे. परंतु हा वेल वीत दीड वीत लांब झाला म्हणजे फळें येऊं लागतात.

याच्या दोन जाति आहेत. एकाचें फळ लांबोडें असतें व दुसऱ्याचें चाटोळें असतें. याची भाजी लवकर शिजते व खाण्यास आपल्या भोंपळ्यापेक्षां अधिक रूचकर आहे.

---

## रोझेल ( तांबडी आंबाडी. )

ही एक आंबाडीची जात आहे. याला फळें आंबाडीसारखीं असून तांबडीं असतात. याचें बीं पर्जन्य पडण्याचे पूर्वीं खतावलेल्या जाग्यांत हाताचे अंतरानें लावावें. याचीं फळें फार आंबट असतात, याच्या फळाची बी वरील साल असते ती शिजवून त्याचा अर्क काढून त्यांत साखर घालून खाण्याचा पदार्थ करितात, व तशींही खातात.

---

## जनावरांस मानवणाऱ्या गवतांविषयीं माहिती.

### लुसर्नग्रास ( विलायती गवत )

याची लागवड करणें फार सोपी आहे. चुन्याचा अंश ज्या जमिनींत असेल ती जमीन दोनतीन वेळां नांगरून त्यांत कोणतेंही कुजलेलें खत पुष्कळ घालून, पावसाळ्यांत झाडझुडूप उगवतें तें उपटून साफ तयार करावी. या देशांत काळ्या जमिनींत चुन्याचा अंश फार असतो, सबब ही काळी जमीन या गवतास फार हितकारक होते. पावसाळा संपण्याचे सुमारास याचे वाफे तयार करून भाद्रपदपासून कार्तिकपर्यंत पाहिजे तेव्हां बीं पेरावें. गांवठी बीं मोठें असतें सबब तें पाभारीनें ज्वारीसारखें पेरावें, आणि विलायती बीं बारीक असतें म्हणून त्यांत बारीक माती मिसळून पेरावें. पाभारी नसल्यास टिकावानें वाफ्यांत वितीवितीचे अंतरावर ओळी काढून त्यांत हातानें पेरावें. कोणी हें बीं भाताप्रमाणें फेंकून हातानें पोरितात; परंतु असें पेरिल्यापासून त्याची कापणी व खुरपणी करण्यास फार कठिण पडतें. याकरितां वर सांगितल्याप्रमाणें पेरिलें असतां अडचण पडत नाहीं. ज्या देशांत पाव-

साळा कमी असतो त्या देशांत एक बिध्यास पांचपासून सहा शेर वजनी बीं पुरें होतें, व जेथें पावसाळा फार, त्या ठिकाणीं दहा शेरपासून बारा शेर पेरावें लागतें. हें पेरिल्यापासून तीनचार दिवसांनीं उगवतें. याची पहिली कापणी महिना सवा महिन्यांनीं करावी, व गवत पहिल्यानें कापते-वेळीं फार जपून कापावें; म्हणजे झाड उपटून येऊं नये अशा तजविजी-नें कापावें; व पुढच्या कापण्या १५-२० दिवसांनीं कराव्यात. या गवतास फूल येऊं लागलें म्हणजे हें गवत कापण्यास तयार झालें असें समजावें. जर हें गवत अधिक दिवस राहिलें, तर जनावरास चांगलें पचत नाहीं, व त्या झाडाचा जोर कमी होतो. प्रत्येक कापणी झाल्यावर लागलीच खुरपणी करावी, आणि पाणी द्यावें, व दोन कापण्या झाल्यावर तिसऱ्या कापणीस खुरपून खत घालावें व आठवड्यांतून दोन वेळ पाणी द्यावें. पहिल्यानें पाणी देणें तें फार जपून बेतानें दिलें पाहिजे, तें अशाकरितां कीं,बीं पाण्यानें एके ठिकाणीं गोळा होऊं नये. हें पेरिल्यापासून तीन वर्षें-पर्यंत सतत राहतें. हें गवत जनावरांस फार शक्ति आणणारें आहे. हें ग-वत जनावरांस माफक द्यावें, फार घालूं नये. हें रोज घातलें असतां त्यांस रोगराई सहसा होत नाहीं.

---

## लॉन ग्रास.

### ( नानाप्रकारचे रंगांचें सुरेख दिसणारें गवत. )

हें बीं पाऊस पडण्याच्या सुमारास जेथें आपणांस हिरवीं जागा पाहि-जे असेल तेथें पेरावें, व हें चारसहा बोटें उंच झाल्यावर गवत काप-ण्याची कातर असते, तिनें त्याचे सारखे शेंडे उडवावेत म्हणजे सारखें हिरवें दिसतें, व त्यामुळें पायास चिखल वगैरे लागत नाहीं, साहेब लोकां-ची व श्रीमंत लोकांची चेंडूदांडू खेळण्याची जी जागा असते तेथें या गवताच्या बियांचा उपयोग करितात. हें मोठें झाल्यावर कापून गुरां-सही घालतात.

---

## ग्वायना ग्रास.

हें एक गवत कांहींसें दर्भासारखें वाढणारें आहे. हें कोणच्याही प्रकारच्या जमिनींत चांगलें होतें. खतावलेली जमीन असली म्हणजे झालें. ह्याला पाणी विशेष लागतें. हें गवत गुरांना व घोड्यांना चांगलें मानवतें. हें बारमहा रहातें. हें कापलें असतां पुनः तें पंधरा दिवसांनीं कापण्यास तयार होतें. दोन कापण्या झाल्यावर तें खुरपून त्याला खत घालावें आणि पाणी द्यावें. याच्या चारचार काड्या हाताहाताच्या अंतरावर लावाव्या, म्हणजे थोडे दिवसांनीं याचीं मोठीं बेटें होतात व पुष्कळ लावणें झाल्यास तींच बेटें फोडून लावावींत. ह्या गवताला बीं येतें. त्या बियांपासूनही झाडें होतात. बीं फार बारीक असतें, याकरितां त्याची लागवड करण्यास चांगला कुशल मनुष्य लागतो; परंतु त्याची मुळ्यापासून लागवड करणें सोपी आहे.

---

## रियालक्झुरीयन्स.

हें उंच मोठें जोंधळ्यासारखें वाढणारें गवत आहे. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. पाणी व खत असलें म्हणजे झालें. हें बारमहा होतें. हें पंधरा पंधरा दिवसांनीं खालचा हात हात बुडखा राखून कापावें. हें गवत गुरांस व घोड्यांस चांगलें मानवतें. याचें बीं धरणें झाल्यास कार्तिक मार्गशीर्ष महिन्यापासून कापणी बंद ठेवावी, म्हणजे हें उंच वाढून प्रत्येक पेराला मक्यासारखें बारीक बारीक कणीस येतें, त्यांत करडई एवढाले दाणे असतात, तें चांगलें पिकलें म्हणजे बीं धरावें आणि तें पुन्हा पेरिलें म्हणजे त्यापासून झाडें पुष्कळ होतात, व बीं काढते वेळेस खालीं कांहीं बीं पडतें, त्याला पाणी मिळालें म्हणजे त्याचें रोप उगवतें, तें रोप काढून वितीवितीच्या अंतरानें चांगल्या खतावलेल्या जमिनींत लाविलें असतां चांगलें होतें.

---

## सारघुवम ( काळे जोंधळे. )

सारघुवम म्हणून एक जोंधळ्याची जात आहे, याला कणसें भाताच्या लोंगरासारखीं येतात. याचें बीं काळें व किंचित् तांबूस रंगाचें असतें. चीन देशाच्या उत्तरेस याची लागवड दोन वेळां करितात व याच्या ताटाचा रस काढून साखर करितात. हें ताट खाल्लें असतां उंसासारखें गोड लागतें. याची इकडे रस काढून साखर करण्याची वहिवाट नाहीं; परंतु गुरांना हा कडबा फार चांगला मानवतो, म्हणजे जितक्या कडब्याच्या जाति आहेत त्यांमध्यें हा उत्तम कडबा आहे. याच्या दाण्याच्या भाकरी होतात, परंतु गोड लागत नाहींत, कोंड्याच्या भाकरीसारख्या लागतात.

---

# स्वदेशीय भाजीपाला.

## भेंडी.

ही बहुतकरून या देशांत सर्व ठिकाणीं होते. इचें बीं पाऊस पडण्याच्या सुमारास हाताहाताच्या अंतरावर एकेक बीं लावितात, ही भेंडी पावसाळ्यांत व उन्हाळ्यांतही होते, परंतु पावसाळ्यांत लावलेल्या भेंडीस भेंड्या पुष्कळ येतात. यांत हळी आणि गरी अशा दोन जाति आहेत व यांत दोनतीन प्रकार आहेत. एकीस वीत दीड वीत भेंडी येऊन कांटे नसतात व हिरवीगार दिसते व दुसरीस चार सहा बोटें लांब येऊन भेंडीच्या आंगास बारीक बारीक कांटे असतात. हिची भाजी वर लिहिलेल्या भाजीसारखी चांगली होत नाहीं; व तिसरी एक जात आहे त्या भेंडीला कस्तुरीसारखा वास येतो. ही भेंडी पुष्टकारक आहे.

---

## गवारी.

ही भाजी बहुतकरून आपल्या सर्व हिंदुस्थान देशांत होते व बहुतकरून सर्व जातींच्यां लोकांस आवडते. हिची लागवड पाऊस

पडण्याच्या सुमारास खतावलेल्या जाग्यांत हाताहाताच्या अंतरावर एकेक बीं लावतात व याची हिंवाळ्यांतही लागवड करितात. सारांश, ही भाजी बारमहा होणाऱ्यापैकीं आहे. हें झाड हातभर उंच वाढलें म्हणजे याला फुलें व शेंगा येऊं लागतात, व झाड जसजसें उंच वाढतें तसतसें त्याला फुलें व शेंगा येऊं लागतात. हें झाड चारपांच महिने राहतें, आणि चांगली जमीन असली म्हणजे डोकीइतकें उंच वाढतें. याच्या कोंव-ळ्या शेंगांची भाजी फार उत्तम होते. यांत हळी आणि गरी अशा दोन जाति आहेत.

---

## कोहोळा.

ही उत्तम भाजींपैकीं भाजी आहे. याचें बीं खतावलेल्या जाग्यांत अक्षतृतीया झाली म्हणजे आळें करून त्यांत चार पांच बिया लावतात. व उगवल्यावर वेल वर जाण्याकरितां काठ्या लावितात व त्याला मांडव करितात. हा मांडवावर मोठा वेल वाढून पुढें श्रावण व भाद्रपद या महिन्यांत त्यास फळें येऊं लागतात. फळांचा आकार कलिंगडासारखा असतो व फळही कलिंगडाएवढेंच मोठें असतें. या फळाला बाहे-रून राखेसारखा पांढरा पदार्थ असतो व फळाला बारीक बारीक कुसें असतात. हीं फळें आश्विन व कार्तिक या महिन्यांत चांगलीं पक्क होतात. याची भाजी होते व याच्या फोडी करून याला तिखट मीठ लावून उन्हांत वाळवून ठेवितात म्हणजे गरज लागेल त्या वेळेस तळून त्या भाजीच्या ऐवजीं याचा उपयोग करितात; याला सांडगे म्हणतात. या-चा पाक करितात, त्याला कोहोळेपाक म्हणतात. हा फार पुष्टकारक आहे.

---

## दिलपसंत.

याला धेंडसी म्हणतात. ही भाजी पावसाळ्यापेक्षां हिंवाळ्यांत चांगली होते. ही बहुतकरून नदीच्याकांठीं जेथें खरबुजाच्या वाड्या वगैरे करितात त्यांत लावितात. याचे वेल वाढतात. याचीं फळें साधारण आंब्या-

एवढाली असतात. याचा वरून आकार कांहींसा कोहळ्यासारखा दिसतो. याची भाजी पांढऱ्या भोंपळ्यासारखी होते.

**पडवळ**---हा एक नाजूक वेल आहे. हा मांडवावर अगर झाडावर चढतो. मांडवावर चढविला असतां याला पुष्कळ पडवळें येतात. याचें बीं वैशाखमासीं म्हणजे अक्षतृतीयेचे सुमारास दोन हात चौरसचौरस जागा खणून त्यांत कोणचेंही कुजलेलें खत घालून अगर केरकचरा, गोंवऱ्या घालून ती जमीन भाजावी; नंतर त्याचें आळें करून त्यांत चार किंवा पांच बिया लावाव्या. त्याला रोज पाणी घालीत जावें, आणि तो वेल जसजसा वाढेल तसतसा त्याला काठ्या लावून उंच डोकी इतका वाढूं द्यावा. नंतर त्याच्या आसपास चार अगर पांच हातांच्या अंतरावर तीन अगर साडेतीन हात उंचीचे खांब चार चोहोंबाजूस पुरावेत, त्यावर आडव्या काठ्या घालून त्यावर बारीक बारीक खांद्या टाकून मांडव करावा, त्यावर तो वेल चढूं द्यावा. तो वेल बुडाशीं महिन्यांतून दोनदां खुरपावा व कुजलेलें खत घालावें; म्हणजे याला आषाढाच्या महिन्यापासून पुष्कळ दोनदोन तीनतीन हात लांबीचीं पडवळें येऊं लागतात. त्याला आश्विनअखेरपर्यंत पुष्कळ पडवळें येतात. याची भाजी फार उत्तम होते. यांत दोन जाति आहेत, एकीला लांब पडवळें येतात व दुसरीला लहान येतात, त्याला घणसें पडवळें म्हणतात, तें अंगानें जाडी असतें; या पडवळावर एक प्रकारच्या सापासारख्या पांढऱ्या पांढऱ्या रेघा असतात व हिरवेपणीं या पडवळाला एक प्रकारचा चमत्कारिक वास येतो, परंतु भाजीला येत नाहीं.

**घोसाळीं**---हा एक वेल आहे. याचें वर सांगितल्याप्रमाणें पडवळाच्या आळ्यासारखें आळें करून त्यांत चारपांच बिया वैशाखाच्या महिन्यांत लावाव्या, आणि तो वेल मांडवावर अगर झाडावर चढवून द्यावा म्हणजे याला घोसाळीं श्रावणाच्या महिन्यापासून मार्गशीर्ष अखेरपर्यंत पुष्कळ येतात. ह्या वेलाला जपलें तर हा दोनदोन वर्षें सुद्धां रहातो. त्यांत दोन जाति आहेत. एक पारोशी व दुसरी घदघोसाळी. पारोशीचें घोसाळें

चांगलें हातभर लांब असतें व पायाच्या पोटरीसारखें जाड असतें. घड- घोसाळीचें घोसाळें आंखूड टीचभर लांब असतें व एकएका घडा- ला चारचार पांचपांच घोसाळीं लागतात. पारोसी घोसाळीपेक्षां हा वेल बारीक असून नाजूक असतो. या दोहों जातींच्या घोसाळ्यांची भाजी व भजीं फार उत्तम होतात.

**दोडका**—हा एक वेल आहे. हा मांडवावर अगर झाडावर चढविला असतां चढतो व भुईवर जरी असला तरी याला दोडके पुष्कळ येतात. यांत दोनतीन जाति आहेत. एकास शिरा असून हातभर लांब असतो व दुसरा तितकाच असून त्याला शिरा नसतात. एकाला जाडी शिरा अ- सून दीड हात दोन हातपर्यंत लांब असतो. या सर्वांच्या भाजीची रुचि बहुतकरून सारखीच आहे. याची भाजी दररोज कांहीं दिवस खाल्ली- तर अमांश होतो. हे दोडके पावसाळ्यांत चांगले होतात व उन्हाळ्यां- त जरी लाविले तरी दोडके येतात, परंतु लहान येतात.

**कारलीं**--हा एक लहानसा नाजूक वेल आहे. याचीं पानें कातरलेलीं बोटासारखीं असतात. हा मांडवावर अगर झाडावर च- ढविला असतां चढतो. हा वेल कोणच्याही जमिनींत चांगला होतो. याचें बीं वैशाखमासीं लावितात व यास फळें श्रावण महिन्यापासून का- र्तिक महिन्यापर्यंत पुष्कळ लागतात. यांस पाणी नेहमीं मिळालें अ- सतां हा वेल बारमहा राहतो. यांत दोनतीन जाति आहेत. एकीचें फळ लहान असून काळसर रंगाचें असतें व दुसऱ्या दोन जातींचीं फळें वीत दीडवीत लांब असून त्यांचे रंग निराळे आहेत.
एकाचा रंग सफेत पांढरा व एकाचा हिरवा असतो. वर लिहिलेल्या लहान कारल्यापेक्षां यांस कडूपणा थोडा कमी असतो. याची चिंचगूळ घालून भाजी केली असतां फार उत्तम होते. हें पित्तकर आहे. लहान मुलास कफ झाला असतां ज्याला खोकतां येत नाहीं अशा मुलास याच्या पान्याचा रस थोडा दिला असतां कफ पडून मूल मोकळें होतें.

**तांबडा भोंपळा**—याला कोणी काशीफळ म्हणतात. याच्या बिया वैशाखमासीं खतावलेल्या जाग्यांत आळें करून त्यांत लावाव्या. हा मांडवावर न चढवितां जमिनीवर वाढूं दिला तरी चांगला होऊन पुष्कळ भोंपळे येतात. यांत दोन जाति आहेत. एक वाटोळा असतो व एक लांबोळा असतो. वाटोळ्याला गोडी विशेष असते. याची भाजी होते व दुसरेही पदार्थ पुष्कळ होतात. याच्या आंतील बिया खाण्यास कांहींशा बदामासारख्या लागतात व हलव्यांतही घालितात. याची भाजी थोडी वातूळ आहे.

**पांढरा ( दुधा भोंपळा )**-हे बहुतकरून बारमहा होतात, याच्या बिया पाऊस पडण्याच्या अगोदर खतावलेल्या जाग्यांत लावितात. याचा वेल मांडवावर चढविला अगर जमिनीवर वाढूं दिला तरी पुष्कळ भोंपळे लागतात. यांत चार जाति आहेत. एकाचें फळ दोन हातपर्यंत वाढतें व दुसरी जात खालील भाग मोठा व डोक्याकडे लहान अशी एक आहे, त्याला कुंडिया म्हणतात. याची भाजी तर होतेच; परंतु पोहोण्याच्या कामांत यांचा विशेष उपयोग करितात. व याचीच एक जात आहे त्याचें फळ बहुतेक वाटोळें असतें व साल जाडी असते, सबब तंबुरे, विणे यांकडे याचा उपयोग करितात, व यास किंमतही पुष्कळ येते. एक कडू भोपळा आहे, याचीं पानें वगैरे आकार पांढऱ्या भोपळ्याप्रमाणेंच आहे; परंतु पानाला फार उग्र वास येतो व हे भोंपळे लहान असून फार औषधी आहेत.

**चवळी**—ही एक लहानशी वेलासारखी वाढणारी जात आहे. याचें बी पावसाच्या सुमारास खतावलेल्या जागेंत लावितात व याला शेंगा श्रावण भाद्रपद या महिन्यापासून येऊं लागतात. यांत दोन जाति आहेत. एक तांबडी व एक पांढरी. पांढरीच्या शेंगा पांढऱ्या असून आंत बींही पांढरें असतें. कोंवळ्या असतात तेव्हां या शेंगांची भाजी फार उत्तम होते.

**चुका**—हें लहानसें पोकळ्याच्या भाजीसारखें वाढणारें झाड आहे.

याचीं पानें हिरवीं व जाडी असतात व हीं अतिशय आंबट असतात. याचें बीं खतावलेल्या जाग्यांत आश्विन व कार्तिक म्हणजे पावसाळा संपल्यावर वाफ्याच्या दंडानें लावितात. याची पातळ भाजी फार चांगली होते, पण आंबट असते. हीं झाडें उपटलीं नाहीं तर उन्हाळ्यामध्यें म्हणजे चैत्र वैशाखमाशीं यांस बियांचे तुरे येतात. हें बीं कागदासारखें मऊ असतें. याला पाऊस फार सोसत नाहीं.

**चाकवत**—हें वीत सवा वीत उंच वाढणारें झाड आहे. याचीं पानें दोनतीन बोटें रुंदीचीं असून थोडीं लांबोडीं असतात. याचें बीं पावसाळा संपल्यावर वाफ्यांतून पेरितात. याची पातळ भाजी फार उत्कृष्ट होते व ती फार पाचक आहे, याला शिजण्याला बिलकूल वेळ लागत नाहीं. तुरीची डाळ वगैरे दुसरीं धान्यें शिजण्यास उशीर लागतो त्यांत हीं चाकवताचीं दोनचार पानें घातलीं असतां लवकर शिजतात. या भाजीला पाऊस सोसत नाहीं. याला तुळशीसारख्या उन्हाळ्यांत मंजिऱ्या येतात; त्यापासून बीं काढितात.

**मेथी**—ही भाजी सुमारें वीतभर उंच वाढणारी आहे. हिचें बीं हिंवाळ्यांत खतावलेल्या जाग्यांत पेरितात, व हें बीं पेरिल्यापासून वीसबावीस दिवसांनीं भाजी तयार होते. हिची पातळ व कोरडी भाजी चांगली होते. हिच्या अंगीं उष्णता विशेष आहे. या भाजीच्या बियाला हरभऱ्याच्या आंबीचीं सात पुटें देऊन हें पेरिलें असतां आठनऊ दिवसांनीं भाजी खाण्यालायक होते व ही न उपटतां ठेविली तर उन्हाळ्यांत याला लांब लांब शेंगा येऊन बीं पुष्कळ येतें व बियाचीही भाजी चांगली होते.

**पोकळा**—ही भाजी थंडीच्या दिवसांत होणारी आहे. ह्या भाजीचें बीं आश्विन कार्तिक या महिन्यांत पुष्कळ खत घालून तयार केलेल्या जमिनींत पेरितात. हें पेरिल्यापासून वीसपंचवीस दिवसांनीं भाजी तयार होते. ही भाजी पथ्यकारक आहे,. ही दुखणाईत मनुष्यास घालितात.

उपटली नाहीं तर याला पुष्कळ बीं येतें. हें राजगिऱ्यासारखें काळें बारीक असतें. या भाजीचीं पानें व देंठ तांबडे असतात.

**करडई**--ही एक भाजी हातभर उंच वाढणारी आहे. हें बीं हरभरा किंवा गहूं यांत पेरितात. कोंवळी असते तेव्हां भाजी करितात, जून झाल्यावर ही तशीच ठेऊन याचें बीं काढितात व त्याचें तेल काढितात व याची पेंड होते. या भाजीला एक प्रकारचा उग्रट वास येतो.

**माठ**--ही भाजी पोकळ्याच्याच वर्गांतली आहे, म्हणजे हिचीं पानें व देंठ बहुतेक पोकळ्यासारखेच आहेत; परंतु देंठ पुरुष पुरुष सुद्धां उंच होतात व ते दोनदोन वर्षे पर्यंतही राहतात. या देंठांचीं वरचेवर पानें खुडून त्याची भाजी करितात व याचे कोंवळे कोंवळे देंठ कापून शेवग्याच्या शेंगासारखी भाजी होते.

**तांदुळजा**—याला कोणी चवळईची भाजी म्हणतात. हिची लागवड बहुतेक पोकळ्यासारखीच आहे. झाड व पानांचा आकार वगैरे पोकळ्या सारखाच जवळ जवळ आहे, परंतु याच्या पानांचा रंग हिरवा आहे, पोकळ्या सारखा तांबडा नाहीं. ही भाजी बहुतकरून बारमहा होते. ही फार पथ्यकारक आहे. याचे बीं काळें बारीक काहींसें राजगिऱ्यासारखें असतें.

**अळूं**—ही भाजी बहुतकरून बारमहा सांपडते. याचे कांदे जेथें सदोदित पाणी असतें अशा ठिकाणीं लाविले म्हणजे हें चांगले होतें. याला खत, शेण व घोड्याची लीद चांगली मानवते. याला गुरूं वगैरे जनावरें खात नाहींत. याच्या भाज्या चारपांच तऱ्हेच्या करितां येतात. पातळ, कोरडी, देंठी, वड्या वगैरे उत्तम होतात. पोटांत केंस वगैरे गेले तर याची भाजी खाल्ली असतां त्याचें पाणी होतें असें म्हणतात. याच्या कांद्याचीही भाजी चांगली होते; परंतु आंबट घातल्यावांचून ही भाजी चांगली होत नाहीं, कारण याला थोडी खाज आहे.

**मुळे**—हें झाड सुमारें हातभर उंच वाढणारें आहे. याला खता-

वलेली पोकळ जागा असली म्हणजे चांगले मोठे मुळे येतात. याच्या पाल्याची भाजी होते, मुळ्याची भाजी होते, व याच्या शेंगा ज्याला डिं-गऱ्या म्हणतात त्याचीही भाजी करितात. डिंगऱ्या येण्याच्या पूर्वी मुळा काढल्यावर खालील पांढरा भाग कापून घेऊन बुडखा राखून तो लावून त्याला ज्या डिंगऱ्या येतात त्याचें बीं धरून तें लाविलें म्हणजे त्याला मुळे मोठे येतात. जें बीं लावून झाडें होतात त्यालाच जर डिंगऱ्या येऊन त्याचें बीं धरिलें तर त्यापासून मुळे मोठे येत नाहींत. याचीच एक जात सुरत व अमदाबादेकडे आहे, त्याला शेंगा दोनदोन हात लांब येतात, त्याची भाजी डिंगऱ्यासारखीच होते; याला मोगऱ्या म्हणतात, त्यांचा कांहींचा रंग हिरवा असतो व कांहींचा तांबडा अ-सतो. भाजीला स्वाद वगैरे डिंगऱ्यांसारखाच असतो.

**घेवडा**–हा एक वेल आहे. याचें बीं आश्विन कार्तिक या महिन्यांत कुंपणाशेजारीं अगर एकादे झाडावर पाण्याचा ओलावा असेल अशा ठिकाणीं लावावें म्हणजे याला उन्हाळ्यांत शेंगा येऊं लागतात. व हा वेल वर्ष दोन वर्षे रहातो. याला पावसांत शेंगा येत नाहींत, परंतु पुढें पाऊस गेल्यानंतर लौकर शेंगा येऊं लागतात. यांत चारपांच जाति आहेत. एक पांढरा जाड सालीचा. दुसरा पांढराच असून बारीक शेंगा येणारा. एकास काळसर रंगाच्या शेंगा येतात, त्यांत दोन जाति आहेत. एकाची चापट रुंद शेंग असते व एकाची काळी असून लांब असते, याच्या दाण्याची भाजी होते व कोंवळ्या शेंगाचीही भाजी फार उत्तम होते. यावर कधीं कधीं बारीक हिरव्या रंगाचे किडे पडतात, त्याला मावा म्हणतात, त्या वेळेस त्याजवर राख फेंकली म्हणजे कांहीं कमी होतात.

**चवधारी घेवडा**—याचें बीं पाऊस पडण्याचे सुमारास लावितात. हा एक वेल आहे. याची लागवड वर लिहिलेल्या घेवड्यासारखीच आहे. याला शेंगा येतात त्या हिरव्या रंगाच्या असून त्याला चार धारा असता-

स व त्या सर्व धारा कातरलेल्या असतात. या शेंगा सुमारें वीतभर लांब असतात. याची भाजी फार उत्तम होते.

**आबई**—हा एक वेल आहे. हा मोठा वाढणारा आहे व पुष्कळ वर्षे राहतो. ह्याची शेंग दोनअडीच बोटें रुंद असून वीतभर लांब असते. या शेंगाची कोंवळेपणीं चांगली भाजी होते. हा वेल कोणच्याही जमिनींत होतो. पाण्याचा मात्र ओलावा पाहिजे.

**वालपापडी**—हा एक घेवडयासारखाच वाढणारा वेल आहे. ह्याला कोणचीही जमीन असली तरी चालते, पाण्याच्या आश्रयाला लावला म्हणजे झालें. याच्या शेंगा हिरव्या असतात. दाण्याची उसळ व आंबटी फार चांगली होते. कोंवळ्या शेंगांची भाजी चांगली होत नाहीं. ह्याची साल चिवट असते.

**कोथिंबीर**—याच्या बियास धने म्हणतात. हे कोणच्याही खतावलेल्या जागेत पेरावे. याला पाणी आठवडयांतून दोन वेळां तरी मिळालें पाहिजे. याच्या पाल्यास एकप्रकारचा चांगला वास येतो, ह्याला कोथिंबीर म्हणतात. याचा उपयोग भाजीला स्वाद येण्याकरितां किंवा तिखटांतही वासाकरितांच घालितात. गुरांस खुरकूत म्हणजे तोंडांतून लाळ वगैरे गळते व कांहीं खात नाहीं त्या वेळेस या कोथिंबिरीचे टाहळ्यावर थोडें तेल टाकून गुरांस चारआठ दिवस दिवसांतून दोन वेळां चारली असतां खुरकूत हा रोग बरा होतो व याची कोरडी भाजीही करितात, परंतु ती फार पित्तकारक आहे.

**वेलचुंडी**—हा एक लहानसा नाजूक वाढणारा वेल आहे. हा मांडवावर अगर झाडावर चढविला असतां चढतो. याला पाणी विशेष पाहिजे. याच्या पानांची भाजी चाकवताच्या पातळ भाजीसारखी उत्तम होते. हा वेल दारांत असला म्हणजे याची भाजी बारमहा हवी तेव्हां सांपडते. याला बोंडें येतात तीं तांबूस रंगाचीं असतात व दुसऱ्या जातीचीं पानें तांबडीं असतात. दोहोंची भाजी सारखीच होते.

**तोंडली** -हा एक वेल आहे. हा मांडवावर चढतो व झाडावर चढविला असतां चढतो. याला सदोदित जेथें गारठा राहील अशा ठिकाणीं लावावा. विशेषेंकरून आंघोळीचें ऊन पाणी जेथें जातें अशा ठिकाणीं लाविला असतां चांगला होतो. याला तोंडलीं बहुतकरून बारमहा येतात. याचें फूल कधीं वांझें नसतें. प्रत्येक फुलास फळ येतें. याचे वेल तोडून वेटोळें करून लावावें म्हणजे चोहोंकडून ह्याला अंकूर फुटून याचे पुष्कळ वेल होतात. याची कोरडी व पातळ भाजी फार चांगली होते. याचा तोंडलीभातांत उपयोग करितात. याच्या फळाला तोंडलीं म्हणतात व तीं हिरवीं खाल्लीं असतां जीभ जड होते व बुद्धि मंद होते असें म्हणतात. फुरसें वगैरे चावलें असतां याची भाजी त्या मनुष्यास खाऊं देऊं नये, खाल्ली असतां विष ज्यास्ती बाधतें.

**परवर**—हा तोंडल्यासारखा वाढणारा वेल आहे, परंतु याचीं पानें तोंडल्याच्या वेलापेक्षां निराळीं आहेत, म्हणजे थोडीशी लांबोडीं आहेत. याची लागवड बियापासून होते, परंतु याच्या वेलाचे तुकडे करून लावले असतां जगतात. हे तुकडे लावण्याचे दिवस म्हटले म्हणजे चैत्र वैशाख हे महिने आहेत. याला वाढण्याला तोंडल्यासारखाच मांडव करावा लागतो. याला जमीन कोणची असली तरी चालते परंतु खतावलेली असली म्हणजे झालें. याला पाणी विशेष लागतें. याला फळें येणारे दिवस म्हटले-म्हणजे हिंवाळ्याचे चार महिने हे आहेत. उन्हाळ्यांत येतात, परंतु फार थोडीं येतात. हा वेल बारमहा राहणारा आहे. चैत्र वैशाखीं त्याचा बार गेल्यावर याला थोडथोडें खच्ची करावें आणि खत द्यावें म्हणजे पुन्हां फुटूं लागतो. याचीं फळें तोंडल्यासारखीं हिरवीं व गुळगुळीत नसतात, म्हणजे कांहींशीं बारीक सेंदण्यासारखीं दिसतात. याची भाजी उत्तम होते.

**शेवगा**—हें मोठें वाढणारें झाड आहे. याचीं झाडें बियापासून होतात व कलमेंही लागतात. हें झाड लावल्यापासून दुसऱ्या वर्षी शेंगा

येऊं लागतात. याच्या शेंगांची भाजी करितात, फुलांची भाजी करितात व पाल्याचीही भाजी करितात. या झाडास विशेष पाण्याची गरज नाहीं व कोणच्याही जमिनींत लाविलें तरी होतें. हें लहान असतें तेव्हां कधीं कधीं पाणी देऊन जगविलें म्हणजे झालें. याची भाजी पित्तकारक आहे; सदोदित फार दिवस पुष्कळ खाल्ली तर डोळ्याला इजा होते. याची साल व मुळ्या फार उष्ण आहेत. म्हणजे हातापायाचे सांधे धरिले असतां ही साल कुटून बांधितात. हीं झाडें या देशांत बहुतकरून सर्व ठिकाणीं होतात.

**चंदनबटवा**--हें झाड कांहींसें चाकवताप्रमाणें वाढणारें आहे. याचें बीं खतावलेल्या जाग्यांत पावसाळ्यांत पेरितात व हिंवाळ्यांतही चांगलें होतें. याचीं पानें चाकवताच्या आकाराचीं असून देंठापाशीं आंतल्या बाजूस थोडीं तांबूस रंगाचीं दिसतात. याची कोरडी भाजी होते व पातळ भाजीही होते. याला एक दिवसाआड पाणी द्यावें.

**पालख**--ही एक पालेभाजी आहे. ही पावसाळ्यांत व उन्हाळ्यांत चांगली होते. हिला एकप्रकारचा कांहीं वास येतो. ह्या भाजीचा शूद्र लोकांत खप विशेष होतो. ही उपटून न काढितां खुडून काढितात म्हणजे ती पुनः फुटून पहिल्यासारखी तयार होते. ही भाजी दोनतीन वेळां खुडून काढली म्हणजे मग बियाकरितां राखितात. याला आठवड्यांतून तीनदां पाणी द्यावें. याला कोणची जमीन असली तरी चालते. खत असलें म्हणजे झालें.

**शेपू**--ही एक पालेभाजी आहे. ही कोणच्याही खतावलेल्या जाग्यांत होते. ही पावसाळ्यांत लावितात परंतु हिंवाळ्यांत चांगली होते. हिला एक प्रकारचा उग्र वास येतो. हिचा खप शूद्र लोकांत विशेष होतो. ही लावल्यापासून महिन्या दीड महिन्यांनीं तयार होते. हिला आठवड्यांतून तीन वेळां पाणी दिलें म्हणजे झालें.

**चिभूड**--हा एक वेल आहे याची लागवड पाऊस लागण्याचे सु

मारास करितात व फळें मोठीं कोहोळ्याएवढीं असून लांबोडीं असतात. पिकल्यावर हीं पिंवळ्या रंगाचीं होतात व कोठें कोठें हिरव्या रेघाही असतात. याची गोडी शेंदाडासारखीच असते. चिभूड हा शेंदाडाच्या जातीपैकीं आहे असें म्हटलें तरी चालेल. हें फार उष्ण आहे.

**कलिंगड**--याचें बीं भाद्रपद व आश्विन या महिन्यांत खतावलेल्या जागेंत लावितात. याचा वेल वाढतो व हीं उन्हाळ्यांत तयार होतात. पिकल्यावर आंतील भाग लाल असतो व हें फळ बाहेरून हिरवें असून वर ठिपके ठिपके असतात. हे बहुतकरून सर्व देशांत होतात. कृष्णेच्या कांठीं व यमुनेच्याकांठीं वगैरे जीं फळें होतात तीं मोठ्याशा घागरीएवढालीं होतात. नदीच्या कांठीं खरबुजांच्या वगैरे ज्या वाड्या करितात त्यांत हीं लावण्याचा प्रघात आहे; परंतु हीं उंसांतही होतात. हीं फार थंड आहेत. यास ओलावा विशेष लागतो.

**खर्बूज**—याची लागवड नदी किनाऱ्यास रेतीमध्यें करितात. याला पाण्याची विशेष गरज आहे. यामध्यें पुष्कळ जाति आहेत. याच्या वरील शिरा कितिकांवर तांबड्या असतात, कितिकांवर पांढऱ्या असतात व कितिकांवर हिरव्या असतात व कितिकांवर पिंवळ्या असतात. कांहीं फळें वरून गुळगुळीत असतात व कांहीं खरखरीत असतात. पिकल्यावर आंतील भाग हिरवा असतो. कितीएकांचा पिंवळा असतो. ह्याची लागवड हिंवाळ्यांत करितात व फळें चैत्र वैशाखीं तयार होतात. याला पावसाचें फार भय आहे, म्हणजे पावसाचे थेंब यावर पडले तर हीं सडूं लागतात. हीं खातेवेळेस फार थंड लागतात, परंतु फार उष्ण आहेत.

**आंबाडी**—याचें बीं पाऊस पडण्याचे सुमारास खतावलेल्या जागेंत पेरितात. हें पेरल्यापासून महिन्या सवा महिन्यांनीं भाजी तयार होते, ही आंबाडी जोंधळ्यांतही पेरितात. याच्या पाल्याची भाजी करितात. ही भाजी आठआठ दिवस जरी शिळी राहिली तरी खराब होत नाहीं.

ही आंबट असते. हें झाड डोकी इतकें उंच होतें. झाडें पाण्यांत कुज-वून याच्या सालीचे दोर काढितात. या आंबाडीचें बीं कुटून पेंडीचे ऐवजीं गुरांस चारितात व कोठें कोठें पेंड तयार करतेवेळीं पेंडींत घालितात.

**आळमुंदा**—याची लागवड चवळी सारखीच आहे, परंतु हा वेल मोठा वाढतो व याचीं पानेंही चवळीपेक्षां मोठीं असतात. शेंग वीत दीड वीत लांब असते व बारिकशा करंगळी एवढी जाड असते. हा वेल जमिनीवर वाढूं दिल्यापेक्षां मांडवावर चढविला असतां चांगला होतो.

---

## कांद्यांपासून होणारा भाजीपाला.

**सुरण**—हा एक कंद आहे. हा कोणच्याही जमिनींत होतो, परंतु भुसभुशीत पोकळ जमिनींत हा चांगला पोसतो. हा लावते वेळेस खड्डा खोल खणून आंत राख वगैरे घालून त्यांत सुरणांचा लहान डोळा (कोंब) असेल तो लावावा. सुरण लावण्याचे दिवस म्हटले म्हणजे पाऊस पड-ण्याचे अगोदर लावावा आणि पाऊस नसेल त्या वेळेस पाणी द्यावें व हे कांदे कार्तिक मार्गशीर्ष या महिन्यांत खणतात व त्या वेळेस तांब्या-एवढा वाटोळा गड्डा सांपडतो. त्याला सभोंवतीं बारीक बारीक सुपारी एवढे गड्डे असतात, ते काढून राख माती मिसळून तयार केलेले मातींत सावलींत पुरून ठेवावे व त्याला महिन्यांतून एकदां पाणी द्यावें म्हणजे चैत्र वैशाखीं त्या डोळ्याला कोंब फुटूं लागतात. नंतर वर सांगितल्या-प्रमाणें पावसाचे अगोदर लावावे व हा कांदा एक वर्षीं न खणितां दुसऱ्या वर्षीं खणिला असतां फार मोठा सांपडतो. डोळे काढून बाकी राहतो त्याची भाजी करितात व उपोषणास खातात. हा पुष्टकारक आहे.

**गोराडू**—याचा वेल वाढतो, याला कोणचीही जमीन असली तरी चालते; परंतु भुसभुशीत पाहिजे. याचे लावण्याचे दिवस व सर्व कृति बहुतकरून सुरणासारखीच जवळ जवळ आहे. याचा गड्डा सुरणासार-खा वाटोळा नसतो, लांबोळा असतो. याचीं पानें सात आठ बोटें रुंद

असतात व देंठ थोडासा तांबूस असतो. याला खाज नसते, सुरणाला थोडी खाज असते. या गोराडूच्या वेलाला बारीक बारीक फळें कधीं कधीं सुपारी येवढालीं येतात, तीं फळें गोराडूसारखीच लागतात व हा आश्विन कार्तिक या महिन्यांत न खणतां दुसऱ्या वर्षी खणला तर गड्डा मोठा सांपडतो. याची भाजी होते. उपासाला शिजवून खातात व भाजूनही खातात.

**रताळीं**—हा एक कंद आहे. हे कोणच्याही जमिनींत खतावलेल्या जाग्यांत होतात. याचे वेल वाढतात आणि प्रत्येक वेलाच्या पेराला मुळी फुटून रताळें पोसतें. हें लावल्यापासून चवथ्या महिन्यांत खणतात. याला पाणी आठवड्यांतून दोनदां मिळालें असतां रताळीं चांगलीं होतात. याचे वेल कधीं कधीं जमिनीपासून वर वर येतात तेव्हां त्यास खत माती घालून ते दाबावे. यांत दोन जाति आहेत. एक तांबडी व दुसरी पांढरी. पांढऱ्या जातीला किडीचा उपद्रव विशेष होतो. हीं रताळीं आपल्या हिंदुस्थान देशांत बहुतकरून सर्व ठिकाणीं होतात. याचें पीठ करून उपासास खातात व याचे सर्व प्रकारचे उपोषणाचे पदार्थ होतात. हें भाजूनही खातात व गरीब लोक याजवर निर्वाह करितात. याचें ब्याणें म्हटलें ह्मणजे हातहात वेलाचे तुकडे करून लावितात.

**हाळद**—ही बहुतकरून सर्व ठिकाणीं उष्ण प्रदेशांत होते. हिला जमीन तांबडी अगर काळी असली तरी चालते. ही ज्या जमिनींत लावयाची असेल ती जमीन हिंवाळ्यांत खोल खणून अगर नांगरून पुष्कळ खत घालून तयार करून ठेवावी आणि त्यांत चैत्र वैशाख या महिन्यांत जमिनीच्या सऱ्या अगर ओळी करून त्यांत वितीवितीच्या अंतराने एकेक कांदा लावावा व त्यास एक दिवसाआड पाणी देत जावें. नंतर ही हाळद मार्गशीर्ष व पौष या महिन्यांत खणावी. याला खालीं आल्यासारख्या फडा होतात व त्याच्या बारीक बारीक लांब लांब

काड्या असतात, त्या काढून घ्याव्या आणि मध्यें कांदा असतो तो तसाच शेणाचे पाण्यांत बुडवून एक वाफा करून त्यांत लावून ठेवावा व त्याला चारचार दिवसांनीं पाणी देत जावें म्हणजे त्याला कोंम येऊन चैत्र वैशाख या महिन्यांत लावण्यास तयार होतात. ज्या काड्या पूर्वी काढून ठेविलेल्या असतात त्या एकदां शिजवून उन्हांत वाळवाव्या.

**आलें**—हें उष्ण प्रदेशांत बहुतकरून सर्व ठिकाणीं होतें. याची लागवड बहुतेक हाळदीसारखीच आहे; परंतु याला हाळदीसारखा मध्यें कांदा नसतो. याला ज्या हाळदीसारख्या फडा येतात त्या फडाचे कुड्यांपैकीं कोंम कोंम पाहून घेण्याकरितां व हाळदीसारखेच वाफ्यांत लावण्याकरितां ठेवावेत. हे पुढें चैत्र वैशाखीं लावावेत. आल्याच्या कुड्यांना वाफ देऊन उन्हांत वाळवितात त्याला सुंठ म्हणतात.

**बटाटे**—याची उत्पत्ति मूळ अमेरिका खंडांतली आहे व त्याची आतां आपल्या हिंदुस्थान देशांत सर्व ठिकाणीं पुष्कळ लागवड होऊं लागली आहे. हे लावल्यापासून चवथ्यापांचव्या महिन्यांत तयार होतात. हे काळ्या मातींत चांगले होतात. कितीएक ठिकाणीं हे पावसाचे अगोदर लावितात व कितीएक ठिकाणीं पावसाळा गेल्यावर आश्विन कार्तिक महिन्यांत लावितात. याला लावण्याची जमीन खोल खतावलेली असावी, व त्याच्या सऱ्या करून बटाट्याच्या दोन अगर तीन फोडी डोळे राखून कराव्या. डोळे म्हणजे बटाट्याला जे खळगे असतात ते त्याचे डोळे आहेत. हे बटाट्याचे तुकडे वितीवितीच्या अंतरावर एकेक सरींत लावावे आणि त्यावर थोडी बेतानें माती घालावी आणि ते उगवून वर आल्यावर त्याच्या बुडाशीं कुजलेलें खत घालून त्या सऱ्याची माती त्यावर घालावी आणि त्याला तिसरे दिवशीं पाणी द्यावें. हें झाड सुमारें हातभर उंच वाढतें. बटाट्याचें बींही असतें याचें रोंप करून बटाट्यांसारखेच लावितात. हे बटाटे पुष्टकारक आहेत. हे उपोषणाचे दिवशीं खातात व याची भाजीही चांगली होते.

**कणगर**—हा एक कांदा आहे याला जमीन कोणच्याही प्रकारची असली तरी चालते. हे जमीन खोल खणून त्यांत पुष्कळ खत घालून त्याच्या सऱ्या करून चैत्र वैशाख महिन्यांत लावावेत. याचे वेल वाढतात व ते वाढण्याकरितां काड्या लावाव्यात. याला एक दिवसाआड पाणी देत जावें, आणि याचे कांदे कार्तिक व मार्गशीर्ष या महिन्यांत खणावेत. याच्या प्रत्येक बुडाला पांचपांच सहासहा कांदे असतात. व ते चांगले टीचभर लांब व मणगटासारखे जाडे असतात. हे उपासाला भाजून खातात व शिजवूनही खातात. हे पुष्टकारक आहेत.

**करांदा**—हा एक कंद आहे. हा कोणच्याही जमिनींत होतो. याचे लावण्याचे दिवस चैत्र वैशाख हे आहेत. कोंकणप्रांतीं रानामध्यें पुष्कळ ठिकाणीं हे आपोआप उगवतात. रानांत उगवणारे हे कडवे असतात व याचा वेल वाढतो. याचा खालीं लाविलेला कांदा एकच रहातो परंतु वेलाला वाटोळीं फळें पुष्कळ येतात तीं फळें भाजून खातात व त्याच्या बुडाचेंही फळ भाजून खातात. याचीच एक जात कोंकणप्रांतीं रानांत सांपडते. याचीं फळें व मुळें यांवर कितीएक दिवस ते लोक निर्वाह करितात. याचीं फळें कडसर लागतात, सबब तिकडील गरीब लोक फळें जमा करून सोलून शिजवितात व त्यांत शेराच्या नांग्याची राख करून शिजविते वेळीं घालितात म्हणजे त्याचा कडूपणा नाहींसा होऊन ते खाण्यालायक होतात.

**आरारूट**—याचें झाड कांहींसें हळदीसारखें वाढतें. याच्या पानाचा आकार हळदीच्या पानापेक्षां निराळा असतो व याची लागवड हळदीसारखीच बहुतेक आहे. याचे बारीक बारीक कोंम असतात ते बियाण्याकरितां ठेवावेत, बाकीच्या फडा साफ धुऊन यंत्रानें किसून याचें पीठ करितात; परंतु सोपा मार्ग म्हटला म्हणजे ते कुटावेत आणि पाण्यांत कुसकरावे व तें पाणी तसेंच ठेवावें. आणि वरचा गाळ व पाणी टाकून द्यावें; खालीं खाफ रहातो तो वाळवावा म्हणजे तें आरारूट झालें. याचीच एक जात आहे त्यास घोरकंद म्हण-

तात. त्याचें मोठें पुरुषभर येरंडासारखें झाड वाढतें. त्याचीं पानें येरंडा- पेक्षां निराळ्या आकाराचीं असतात. याला खालीं मुळी मोठी पोसते. त्या मुळ्या धुवून त्याच्याच कापा पाडून त्या उन्हांत वाळवितात, आणि त्या कुटल्या म्हणजे त्याचें पीठ होतें, तें उपासास खातात. वर लिहिलेल्या हळदीसारखे वाढणारे झाडास बरमुडा आरारूट म्हणतात व त्याचें पीठ हलकें असतें. लहान मुलास लापशी वगैरे करून घातलें असतां पचन चांगलें होतें व घोरकंड याचीं कलमें जगतात व याच्या पिठास कंट्री आरारूढ म्हणतात.

**कांदे**—मागें आनियन पहा.

**लसूण**—याच्या बारीक बारीक कांड्या मोकळ्या करून आणि चां- गल्या खतावलेल्या जागेंत वाफे तयार करून चारसहा बोटांच्या अंतरानें एकेक लावितात. याचे लावणीचे दिवस म्हटले म्हणजे आश्विन व कार्तिक हे आहेत. याला जमीन कोणच्याही प्रकारची असली तरी चालते, परंतु खत मात्र पुष्कळ पाहिजे. हे लावल्यापासून तीनचार महिन्यांनीं तयार होते. हा फार उष्ण आहे; परंतु ज्या पदार्थांत हा घालावा तो पदार्थ मोठा खमंग लागतो. याला आठवड्यांतून तीनदां पाणी द्यावें.

**हिरोळी**-हा एक कंद आहे. हा डोंगराळ प्रदेशांत रानामध्यें तांब- ड्या मातींत आपोआप होतो. याचा वेल वाढतो हा फार लांब जात नाहीं. याचीं पानें बारीक असतात. याला शेंगा येतात. बियापासून याची उत्पत्ति आहे. याला मुळी सुमारें बोटभर लांब व बोटायेवढीच जाडी अशी सांपडते. त्याला हिरोळी म्हणतात. तीं फार गोड व रुचकर लागते.

**बुरमुळा**—हा एक कंद आहे. याचा लांब वेल वाढतो. याची फारशी लागवड करीत नाहींत. कोंकणप्रांतीं हा रानामध्यें आपोआप उगवतो. याच्या पानाची आकृति, शेंगा व फुलें हीं बहुतेक चवळीसारखीं आहेत. याच्या शेंगाचे दाणे चवळीसारखेच लागतात, परंतु कांहीं निराळे तऱ्हेचे- च लागतात. याची उत्पत्ति बियापासून आहे. याच्या शेंगा रानामध्यें

आपोआप वाळून बीं पडतें, त्यापासून झाडें होतात. याला खालीं मुळी तीन बोटांयेवढी जाडी व बोट सवाबोट लांब एवढी सांपडते. हा खाण्यास गोड लागतो. याच्या शेंगाही खातात. हा थंड आहे असें म्हणतात.

**कासाळू**—हा कांदा खतावलेल्या ओलसर जाग्यांत होणारा आहे. याचीं पानें हात दीड हात रुंदीचीं असतात. याचा कांदा लाविल्यापासून वर्ष सव्वा वर्षांत जमिनीपासून हातभर वर सुटतो. याचे देंठ तीनचार बोटें जाडी असून दीड दोन हात लांब होतात. याच्या कांद्याची भाजी उत्तम होते, व याचे सांडगेही करितात. याच्या देंठाची अळूच्या भाजीसारखी भाजी करितात. कानांत वेग लागले असतां हा देंठ विस्तवांत भाजून त्याचे दोन थेंब कानांत पिळले म्हणजे ते वेग राहतात. या कांद्याला थोडी खाज असते. हा कांदा काढून घेतल्यावर त्याचा देंठ पुनः लाविला असतां जगतो. हा कांदा वायूहारक आहे. यासारखाच लाल पानांचा एक कांदा असतो, त्याची भाजी वगैरे करीत नाहींत; परंतु त्याचा पाक करून खाल्ला असतां वायूनें वगैरे धरलेले सांधे सुटतात; हा फारच थोडा खाल्ला पाहिजे, फार खाल्ला असतां पोटांत अतिशय उष्णता होते.

---

# फुलझाडांची माहिती

## विलायती फुलझाडें.



**अस्टर**—हें सुरेख फुलझाडांपैकीं एक फुलझाड आहे. याची लावणी करणें फार सोपी आहे, याचें बीं वाफ्यांत अगर कुंड्यांत पेरावें. वाफ्यांतील अगर कुंड्यांतील माती मात्र चांगली कुजलेले खतांत मिसळलेली असावी, नंतर त्यांत बीं पेरावें. हें वैशाख महिन्यापासून कार्तिक महिन्यापर्यंत कोणतेही महिन्यांत पेरिलें असतां चिंता नाहीं. याचें रोप चारपांच बोटें उंच झालें म्हणजे जेथें लावणें असेल तेथें वितीचे अंतरावर लावावें; यास जमीन मात्र चांगली खतावलेली असावी. पाऊस नसला तर एक दिवसाआड पाणी दिलें पाहिजे. ह्याचे फुलांचे रंग

पांढरे, गुलाबी, तांबडे असे तऱ्हेतऱ्हेचे असतात, व हें फूल कांहींसें शेंवतीसारखें दिसतें.

**अमरान्थस**- याचें रोप हातहाताचे अंतरावर पाऊस पडण्यापूर्वी खतावलेल्या जागेंत लावावें. याचे पानाचा रंग कांहींचा तांबडा व कांहींचा पिवळा असून त्यावर तांबडे ठिपके असतात, व कांहींचे तुरे लोंबत असतात, अशा त्याच्या अनेक जाति आहेत. हीं झाडें बागेंत फार सुरेख दिसतात.

**आन्टरेनम**- हें एक लहानसें फुलझाड आहे. याचें रोप करून वितीवितीच्या अंतरानें एकेक झाड लावावें. याच्या फुलांचा रंग तांबडा, निळा, गुलाबी असा तऱ्हेतऱ्हेचा असतो. याचें पावसाळा लागण्याचे पूर्वी जेथें पाऊस फार नसतो तेथें पाऊस पडण्याचे अगोदर रोप तयार करावें व जेथें पाऊस फार असतो तेथें पावसाळा संपत आला म्हणजे बी टाकून रोप तयार करावें, आणि नंतर लावावें. हीं झाडें दुसऱ्या फुलझाडांचे आंत कोठें कोठें असतात त्याच्या सभोंवतीं लाविलीं असतां फार सुरेख दिसतात. याला खत, माती व पाणी वेळचे वेळेस मिळालें तर हें पुष्कळ वर्षे राहतें.

**आर्जिरेटम** हें एक फुलझाड आहे. याच्या पुष्कळ जाति आहेत. त्या सर्वांची झाडें सारखींच असतात, परंतु रंग व आकार निरनिराळे असतात. हीं फुलझाडें पावसाळ्यापूर्वी रोप तयार करून लावण्यापेक्षां हिंवाळ्यांत लाविलीं असतां चांगलीं होतात. याला पांढरीं, निळीं व तांबडीं फुलें येतात व तीं रेशमी धोतरजोड्यासारखीं सुरेख दिसतात. याला पाऊस नसेल तेव्हां आठवड्यांतून तीनदां पाणी द्यावें.

**बालसम**-( तेरडा ) हें फुलझाड या देशांत उत्तम होतें. याच्या पुष्कळ जाति रानांत सांपडतात. याचें बीं पेरण्यास अगर झाडें लावण्यास चांगली खतावलेली जमीन पाहिजे. याला कुजलेल्या पानांचें खत विशेष हितकारक आहे, हें जर नसेल तर कुजलेल्या शेणाचें खत चा-

लतें व पाऊस नसेल तेव्हां पाणी वरचेवर द्यावें. याचें बीं पावसाळ्यांत कोणतेही वेळीं पेरिलें असतां चिंता नाहीं, बीं मात्र पातळ पेरावें. रोप चारसहा बोटें उंच झालें म्हणजे लावणें असेल तेथें हाताच्या अंतरावर लावावें. हें रोप काढते वेळीं फार जपून मातीसुद्धां काढावें. हें लावल्यावर मधून मधून पातळ खत द्यावें. याच्या कांहीं जातींना खांद्या फार फुटतात, यामुळें फुलें झांकून जातात; म्हणून त्या झाडांच्या खांद्या तोडून पातळ राखाव्यात. याचे फुलाचे रंग तांबडे, पांढरे, गुलाबी, किरमीजी वगैरे तऱ्हतऱ्हेचे असतात.



**क्रिसांथिमम**-( शेवती ) हें लहानसें कुंडयांत वाढणारें झाड आहे. हें कोणच्याही जमिनींत होतें, परंतु काळ्या मातींत हीं झाडें चांगलीं होतात. याच्या पुष्कळ जाति आहेत. एकीला पांढरीं फुलें येतात व दुसरीला पिंवळीं येतात, त्यांतच एक पिंवळी जात आहे, तिच्या पाकळ्या लांब लांब असतात; एकीला तांबडीं फुलें येतात. याच्या मुळाला झाडें फुटतात, तीं फोडून निराळीं केलीं म्हणजे पुष्कळ होतात. या शेवतीच्या फुलांचा हंगाम आश्विन व कार्तिक हे महिने आहेत. याला एक प्रकारचा मधुर वास येतो. हीं झाडें बियापासूनही होतात.

**कालिओपसिस**-याचें फूल पिंवळे रंगाचें असतें. याचें बीं पावसाळा लागण्याचे पूर्वीं अगर संपत आल्यावर चांगल्या खतावलेल्या ज-

मिनींत पेरावें. याचे रोप चारसहा बोटें उंच झालें म्हणजे हाताचे अंतरानें लावावें. याला एक दिवसाआड पाणी द्यावें. महिन्यांतून दोनदां पातळ खत द्यावें, म्हणजे हें झाड सुमारें हात दीड हात उंच वाढून याला पुष्कळ पिंवळ्या रंगाचीं फुलें येतात. हीं झाडें बागेत कोठें कोठें सडकेच्या बाजूनें चारचार पांचपांच अशीं एके ठिकाणीं लाविलीं असलीं म्हणजे फार सुरेख दिसतात.

**क्यांडीटफ्ट**—हें फुलझाड या देशांत बागांस शोभा आणणारें आहे. हें झाड सुमारें वीत दीड वीत वाढतें. याचीं फुलें पांढरीं, निळीं, गुलाबी, वगैरे तऱ्हेतऱ्हेच्या रंगाचीं असतात. याचें बीं पावसाळा संपण्याच्या सुमारास पेरावें, म्हणजे हिंवाळ्यांत यास पुष्कळ फुलें येतात. या झाडाच्या मुळ्या फार खोल जातात, सबब याचें रोप करून लावण्यास फार कठीण पडतें; याजकरितां जेथें आपणास तीं फुलझाडें पाहिजे असतील, तेथेंच खत घालून जमीन तयार करून तें पेरावें; आणि तें चारसहा बोटें उंच झालें म्हणजे चारचार बोटांच्या अंतरावर एकेक झाड ठेवून बाकीचीं झाडें उपटून टाकावीत.



**काक्सकोंब**--याला जर पावसाळा थोडा असला तर सर्व पावसाळाभर फुलें येतात. त्याला चांगली खतावलेली जमीन असावी, व पाणी वेळच्यावेळीं दिलें पाहिजे. आपणास चार महिने फुलें पाहिजे असल्यास पंधरा पंधरा दिवसांनीं बीं पेरावें. याला तीनचार पानें फुटूं

लागलीं म्हणजे जेथें लावणें असेल तेथें लावावें. बीं पेरिल्या वेळीं फार जपावें; जर दाट पेरिलें तर रोप बारीक येतें, आणि तें उपटून लाविल्याबरोबर लहान फूल लागलेंच येतें, सबब बीं पातळ पेरावें, म्हणजे झाड जोरानें वाढून फूल मोठें येतें. याचें फूल चमत्कारिक दिसतें; याचे रंग किरमिजी, पिंवळा, पांढरा असे दोनतीन प्रकारचे असतात. यांत दोन जाति आहेत. एक उंच वाढणारा व एक ठेंगणा. सिलोशिया म्हणून एक फुलझाड आहे तें याच जातींपैकीं आहे.

**क्यारीओपासिस**--याचें फूल पिंवळे रंगाचें असून मागील बाजूस थोडेंसें तांबूस रंगाचें असतें; याचें बीं वैशाख महिन्यापासून श्रावण महिन्यापर्यंत कोणतेही वेळीं पेरिलें असतां चिंता नाहीं. यास फुलें पुष्कळ येतात. याचें रोप करून खतावलेल्या जाग्यावर हात हाताच्या अंतरानें एकेक झाड लावावें. व याला आठवड्यांतून पाऊस नसेल तेव्हां तीनदां पाणी द्यावें; व महिन्यांतून दोन वेळां पातळ खत द्यावें, म्हणजे ह्या झाडाचा मोठा घेर होऊन पुष्कळ फुलें येतात.

**गेलार्डिया**--हें एक लहानसें फुलझाड आहे. याचें रोप पावसाळा संपण्याचे सुमारास करावें, आणि चांगल्या उत्तम खतावलेल्या जाग्यांत दीड दीड वितीच्या अंतरानें एकेक झाड लावावें. याला फुलें तांबडीं, पिंवळीं, पांढरीं वगैरे तऱ्हेतऱ्हेचीं येतात; व तीं फुललेलीं पुष्कळ दिवसपर्यंत राहतात. याला वरचेवर खत देऊन पाण्याचा वगैरे चांगला बंदोबस्त ठेविला तर हीं झाडें पुष्कळ दिवसपर्यंत टिकतात.

**गाम्फ्रीमा**--हें एक लहानसें सुरेख फुलझाड आहे. याचें बीं कुंड्यांत पावसाळा लागण्याचे सुमारास पेरावें व रोप तयार करावें; आणि एकदोन पाऊस झाले म्हणजे हें रोप वितीवितीच्या अंतरानें चांगल्या खतावलेल्या जागेंत लावावें. याचीं फुलें वाटोळीं बटन सारखीं असतात. याचे फुलाचे रंग तऱ्हेतऱ्हेचे असतात; पाऊस जेथें फार असेल तेथें पावसाळा संपल्यावर हीं झाडें लावावींत. याला पावसाळ्यापेक्षां हिंवाळा चांगला मानवतो.



**डायांथस**—हें पिकच्या जातीपैकींच एक फुलझाड आहे. याचें रोप करून पावसाळ्यांत लावण्यापेक्षां हिंवाळ्यांत लावलें असतां चांगलें होतें. याचें फूल एकेरीच असतें, परंतु फुलांमध्यें तीनचार रंग असतात. यांत जाति पुष्कळ आहेत. याला खत व पाणी वगैरे वेळचे वेळेवर दिलें असतां हें फुलझाड वर्षभर सुद्धां राहतें.

**फरगेटमिनाट**—याचें बीं अर्धा पावसाळा झाल्यावर कुंडयांत लावावें व याचें रोप चारसहा बोटें उंच झालें म्हणजे फार ऊन न लागेल अशा ठिकाणीं दीडदीड वितीचे अंतरावर लावावें. याला पाणी विशेष लागतें. उन्हाळ्यांत पाण्याचा वगैरे बंदोबस्त ठेविला असतां हें नेहमीं रहाणारें झाड आहे. याच्या फुलांचा रंग कांहींचा पांढरा, कांहींचा पिवळा व कांहींचा गुलाबी असा तऱ्हेतऱ्हेचा असतो.

**हालीहाक**—एकेरी जातीच्या फुलाचा हालीहाक, ज्या देशांत पावसाळा कमी असतो तेथें होतो. याचें बीं पावसाळा लागण्याचे आरंभीं पेरावें. आणि रोप चारसहा बोटें उंच झालें म्हणजे जेथें लावणें असेल तेथें लावावें. त्यांत कांहीं दुहेरी जातीचा हालीहाक निपजतो, त्याचीं कलमें करून जास्ती वाढवावींत. तीं कलमें उघडया हवेत ठेवूं नयेत. जेव्हां तीं वाढत असतात तेव्हां त्यांस पातळ खत देत जावें.



**हेलीक्रायसम.** ( एव्हरलास्टिंग )--याचें बीं पावसाळा लागण्याचे सुमारास पेरावें, व रोपें चारसहा बोटें उंच झालीं म्हणजे खतावलेल्या जागेंत हाताचे अंतरावर लावावीत. यास फुलें पिवळीं येतात. तीं राखडी सारखी दिसतात, व तीं जरी वाळलीं तरी जशाचीं तशींच दिसतात. हें झाड सुमारें कंबरे इतकें उंच होतें.

**हेलीयोट्रप**--हें एक लहानसें फुलझाड आहे. याचें बीं वैशाखमासीं पेरावें, आणि तें चारसहा बोटें उंच झालें म्हणजे कुंड्यांत एकेक लावावें; अगर खतमातीचा ओटा करून त्यावर हीं झाडें लावावींत, म्हणजे पावसाचें वगैरे पाणी सांचून झाडास इजा न होईल अशी तजवीज ठेवावी. याला फुलें बहुतकरून बारमहा येतात. परंतु हिंवाळ्यांत याला फुलें पुष्कळ येतात. या झाडाला निळ्या रंगाचे फुलांचे झुपकेचे झुपके येतात, व याला थोडा मधूर वास असतो. हें झाड बारमहा टिकतें. याचीं जड दाबून अगर कलमें करून जास्ती झाडें करितां येतात. हीं झाडें अगदीं उन्हांत ठेवूं नयेत, थोडें ऊन व थोडी सावली जेथें असते अशा ठिकाणीं ठेवावींत. याला महिन्यांतून एकदां तरी कुजलेल्या पाल्याचें खत द्यावें.

**आयसोटोमा लॉंजीफ्लोरा**—याचें बीं पावसाळा लागण्याचे सुमारास पेरावें; व याचें रोप चारसहा बोटें उंच झालें म्हणजे हाताचे अंतरावर लावावें. यास फुलें पांढरीं येतात, व यास थोडासा वास असतो. याचे पानांच्या चिकाचा हात डोळ्यांस लावूं नये.

**लाकसंपर**—याचें बीं पावसाळा संपत आला म्हणजे पेरावें; व रोप चारसहा बोटें उंच झालें म्हणजे दीडदीड वितीचे अंतरावर लावावें. याचे फुलांचे रंग तांबडे, पांढरे, जांभळे, असे तऱ्हेतऱ्हेचे असतात. हें झाड हिंवाळ्यांत चांगलें होतें. याला आठवड्यांतून एक वेळ पातळ खत द्यावें. याच्या एक ठेंगणा व एक उंच अशा दोन जाति आहेत.

**लायनम**—हें एक फुलझाड आहे. याच्या दोनतीन जाति आहेत. याचीं फुलें सोनेरी रंगाचीं, पिंवळीं, पांढरीं, किरमिजी, व निळ्या रंगाचीं. ही असतात. याचें बीं पावसाळा लागण्याचे किंवा संपण्याचे सुमारास पेरावें. याचीं फुलें फुललीं म्हणजे झाडावर फार दिवस टिकतात. ह्याचें प्रथमतः रोप तयार करून मग चांगल्या खतावलेल्या वाफ्यांत किंवा कुंड्यांत लावावें. ह्याला चांगली खतावलेली जमीन असली म्हणजे हीं झाडें बरेच दिवस टिकतात.

**लोबेलिया**—ह्या झाडास मार्गशीर्ष महिन्यापासून माघ महिन्यापर्यंत पुष्कळ फुलें येतात. याचें बीं फारच बारीक असतें, म्हणून बीं पेरते वेळीं त्यांत थोडी राख मिसळावी म्हणजे सारखें पेरितां येतें. हें बीं कुंड्यांत अगर पेटीच्या खोक्यांत पेरावें, व त्याजवर खापरीचे तुकडे घालून त्याजवर खतावलेली माती घालावी. याप्रमाणें तो कुंडा अगर खोका तयार झाला म्हणजे त्यांत बीं पेरावें आणि तो कुंडा अगर खोका, दुसरे पाण्याचे भांड्यांत ठेवावा म्हणजे खालून ओल येऊन तें बीं उगवतें.

याला वरून पाणी घालूं नये, याचें कारण असें कीं, याचे मोड फार बारीक असतात, ते वरून पाणी घातलें असतां मोडतात. हें झाड कुंड्यांत फार सुरेख दिसतें.

**मिनॉनेट**—या फुलझाडाचे तुऱ्यास मधुर वास येतो. यास जमीन खोल खणलेली असून खतावलेली असावी. याला पाणी फार लागत नाहीं. याचें बीं श्रावणपासून आश्विनपर्यंत कोणतेही वेळीं पेरिलें असतां चिंता नाहीं. हें बीं जेथें फुलझाड पाहिजे असेल तेथेंच पेरावें. याला

पाऊस नसेल तेव्हां पाणी वेळचे वेळीं बेतानें देऊन, जमीन कठीण होऊं देऊं नये, वरचेवर खुरपीत असावें. याचें रोप करून बदलूं नये.

**नास्तरशम**–हें एक सुरेख फुलझाड आहे. याचें बीं अर्धा पावसाळा झाल्यावर पेरावें, व याचें रोप हाताचे अंतरानें लावावें. याचीं झाडें वेलासारखीं वाढतात, यास फुलें हिंवाळ्यांत येतात, तीं पिवळ्या रंगाचीं असून मधून तांबूस रेघा व ठिपके असतात. याला मधून मधून पातळ खत द्यावें.

**मेरिगोल्ड**–हें फुलझाड बहुतकरून सर्व देशांत होणारें आहे. याच्या जाति पुष्कळ आहेत. याची लागवड करणें अगदीं कठीण नाहीं. कांहींचीं फुलें लहान असतात, कांहींचीं कळीप्रमाणें असतात व कांहींचीं अस्टरप्रमाणें झुबकेदार असतात. हीं झाडें बारमहा केलीं असतां होण्याजोगतीं आहेत. याच्या फुलांस थोडा उग्र वास असतो.



**निमाफिला**–हें एक लहान नीट वाढणारें फुलझाड आहे. याचे फुलाचा रंग निळा, पांढरा वगैरे तऱ्हेतऱ्हेचा असतो. याला हिंवाळा चांगला मानवतो. याचें रोप करून बदलूं नये; जेथें फुलझाडें लावण्याकरितां ओटे केले असतील त्यावरच खत घालून हें बीं पेरावें आणि झारीनें फार बेतानें पाणी द्यावें. हीं झाडें फार दाट उगवलीं असलीं तर त्यांतलीं कांहीं झाडें उपटून चारचार बोटांचें अंतरानें असतील ते-

घटीं ठेवावींत; आणि त्याजला आठवड्यांतून एकदां खुरपून पातळ खत द्यावें व पाऊस नसेल तेव्हां एक दिवसाआड पाणी देत जावें.

**एनाथराइमोंडी**–( इव्हिनिंगप्रिमरोज ). हें लहानसें वेलासारखें वाढणारें झाड आहे. याचीं फुलें पिंवळींधमक असतात. हीं संध्याकाळचे प्रहर दिवसास फुलूं लागतात, व दुसरे दिवशीं चारसहा घटका दिवसास मावळतात. हें झाड पुष्कळ दिवस राहतें. त्याला फुलें बारमहा येतात. याचे जड होतात व बियापासूनही झाडें होतात.

**पॅनसी**–ह्या फुलझाडाचें बीं अर्धा पावसाळा झाल्यावर लावावें. हें झाड बहुतकरून नाताळाच्या सुट्टींत फुलूं लागतें, म्हणजे मार्गशीर्ष महिन्यापासून माघ अखेरपर्यंत यास फुलें येतात. नंतर हें झाड मरूं लागतें. याच्या पुष्कळ जाति आहेत, व यांस निरनिराळ्या रंगाचीं सुरेख फुलें येतात. याचे फुलाचे रंग निळे, काळे, जांभळे, तांबडे, पिंवळे असे तऱ्हेतऱ्हेचे असतात. याचें एकेक निरनिराळे रंगाचें झाड पेल्यांत लावून सारखे रांगेनें मांडलें तर तो देखावा फारच सुरेख दिसतो. हीं झाडें फार नाजूक असतात. यांना आपलेइकडचा मोठा पाऊस सोसत नाहीं.



**पिंक**–पिंक आणि डायान्थस या दोहोंचीं फुलें सारखींच असतात; परंतु

पिंक याचें दुहेरी आणि डायांथस याचें एकेरी असतें. याचें बीं अर्धा पावसाळा जाऊन पाऊस कमी झाल्यावर पेरावें. आणि याचें रोप चारपांच बोटें उंच झालें म्हणजे खतावलेल्या जाग्यांत लावावें. याला हिंवाळ्यांत पुष्कळ फुलें येतात. यास पाऊस फार सोसत नाहीं. याचीं कलमें जगतात. यास खत, माती व पाण्याविषयीं जपलें तर हीं बारमहा रहातात. यांत पुष्कळ जाति आहेत. कारनेशनपिंक म्हणून एक जात आहे, त्यास मोठें लाल फूल येतें. दुसरी क्लव्ह पिंक म्हणून एक जात आहे तिचें फूल पिंवळट रंगाचें असून त्यास वास लवंगेसारखा येतो. या सर्वांचीं कलमें लागतात.



**पिटोनिया**-याचें बीं अर्धा पावसाळा झाल्यावर खतावलेल्या जागेंत पेरावें, व रोप चारसहा बोटें उंच झालें म्हणजे हाताचे अंतरावर लावावें. याला हिंवाळ्यांत पुष्कळ फुलें येतात; व जेथें थंड हवा असेल तेथें उन्हाळ्यांतही येतात. याचीं कलमें जगतात. याचे फुलाचे रंग तांबडे, गुलाबी असे तऱ्हेतऱ्हेचे असतात.

कितीएक जातीच्या पिटोनियाला एका फुलास दोनतीन रंग येतात, यामध्यें डबल पिटोनिया म्हणून एक जात आहे, त्याचीं फुलें तर

फारच सुरेख दिसतात. याला इकडे बीं येत नाहीं सबब कलमेंच करून ही जात वाढवावी लागते. याचें बीं फार बारीक असतें, सबब रोप करते वेळेस विशेष खबरदारी घ्यावी लागते.

**पोर्टुलेका**–या फुलझाडाचीं फुलें निरनिराळ्या रंगांचीं असतात, त्यांतून तांबडया रंगाचीं जीं असतात, त्यांना हिंवाळ्यांत पुष्कळ फुलें येतात. याच्या फुलांचे रंग तऱ्हेतऱ्हेचे तांबडे, पांढरे, पिंवळे, गुलाबी असे असतात. हें झाड जमिनीबरोबर वाढणारें आहे. यामध्यें सिंगल व डबल अशा दोन जाति आहेत. याचें बीं अर्धा पावसाळा झाल्यानंतर पेरावें, व ज्या देशांत विशेष पाऊस पडण्याचा संभव असतो, तेथें पावसाळा संपत आल्यावर पेरावें. बीं बारीक असतें म्हणून त्यांत बारीक रेती मिसळावी; म्हणजे सारखें पेरितां येतें. वाफ्यांत खत वगैरे घालून तयार करून पाणी पुष्कळ द्यावें, नंतर हें बीं पेरावें, हें बीं झांकण्याकरितां बारीक माती वर पातळ पसरावी, व त्याजवर कडक ऊन पडूं नये म्हणून त्यावर छाया असावी. याप्रमाणें चांगलें उगवून येईपर्यंत जास्ती जपावें. हें जेथें लावावयाचें असेल तेथेंच बीं पेरावें. हें बदलावयाचें असेल तर फार जपून बदलावें, कारण हीं झाडें फार नाजूक असतात.

**पॉपी**–याचें बीं जेथें पावसाळा फार असेल तेथें अर्धा पावसाळा झाल्यावर पेरावें, आणि रोप सहा बोटें उंच झालें म्हणजे वितीवितीचे अंतरावर लावावें. यास हिंवाळ्यांत फुलें पुष्कळ येतात. याचीं फुलें पांढरीं, तांबडीं, व गुलाबी रंगाचीं असतात. हीं फुलें मावळल्यावर यास लहानशा सुपारी येवढालीं बोंडें येतात. तीं बोंडें फोडलीं म्हणजे आंत जें बीं निघतें त्यास खसखस असें म्हणतात. बोंडावर बाहेरून जें हिरवें आच्छादन असतें तें चाकूनें वरचेवर चिरलें तर त्यांतून पांढरा चीक निघतो तो वाळल्यावर तांबूस रंगाचा घट्ट होतो. ती अफू होय.



**फ्लाक्स ड्रमोंडी**–हें झाड फुलूं लागलें म्हणजे एक चमत्कारिक रंगाचा गालीच्याच पसरला आहे असें सुशोभित दिसतें. याचें बीं कुंडयांत अगर वाफ्यांत पेरून त्यास चार अगर पांच पानें आलीं म्हणजे, जेथें जागा तयार केली असेल तेथें लावावें. चार महिने हें झाड पाहिजे असल्यास पंधरा दिवसांनीं बीं पेरीत जावें, जर पाऊस फार पडत असेल तर त्या वेळीं पेरूं नये, कमी झाल्यावर पेरावें. याला हिंवाळा चांगला मानवतो याला आठआठ दिवसांनीं खुरपून पातळ खत देत जावें. या फुलाचे रंग तांबडे, पांढरे, किरमिजी असे तऱ्हेतऱ्हेचे असतात.

**स्काबिअस**–हें एक फुलझाड जेथें थोडा पावसाळा असेल तेथें पावसाळ्यांत व हिंवाळ्यांत होणारें आहे. याचें रोप करून हाताहाताच्या अंतरावर लावावें व पाऊस नसेल तेव्हां एक दिवसाआड पाणी देत जावें. फुलें फुलूं लागलीं म्हणजे हीं झाडें फुलानें गच्च भरून जातात, तेव्हां तीं फार सुरेख दिसतात.

**स्वीटपी**–हें फुलझाड वेलासारखें वाढणारें आहे. हें हिंवाळ्यांत होतें. याचें रोप न करितां जेथें लावावयाचें असेल तेथें बीच पेरावें. याला थंड प्रदेश चांगला मानवतो. हा वेल फुलूं लागला म्हणजे फारच विलक्षण शोभा दिसते. जेथें हवा उष्ण आहे, तेथें याला फुलें येत नाहींत. हीं झाडें कुंडयांत लाविलीं असतां कुंडे सावलींत जेथें गारठा

असेल अशा ठिकाणीं ठेवावेत. याला वरचेवर पातळ खत देत जावें. उष्ण खत घालूं नये.



**स्वीट वुइल्यम**-हें फुलझाड पिकासारखेंच आहे व लागवड करणें तीही बहुतेक पिकासारखीच आहे. हीं झाडें हिंवाळ्यांत चांगलीं होतात. ह्याचे फुलाचे रंग तऱ्हेतऱ्हेचे असतात.

**सनफ्लावर**-याचें बीं पावसाळा लागण्याच्या सुमारास पेरावें, व तीन-चार पानें फुटलीं म्हणजे जेथें लावणें असेल तेथें हाताहाताचे अंतरावर लावावें. याचें रोप न करितां जेथें लावणें असेल तेथेंच बीं लाविलें असतां चिंता नाहीं. यामध्यें पुष्कळ जाति आहेत. एक लहान फुलें येणारें सनफ्लावर, एक मोठें फूल येणारें व एकास डबल फूल येतें, तें फार शोभिवंत दिसतें. एक सनफ्लावरची जात आहे, ती बारमहा राहते व त्याचीं कलमेंही जगतात, परंतु फूल लहान असतें.

**टेनवुईकस्टाक**-याचें बीं अर्धा पावसाळा झाल्यावर कुंडयांत पेरावें; व रोप चारसहा बोटें उंच झालें म्हणजे खतावलेल्या जागेत लावावें. याचें बीं पेरिल्यापासून दहाबारा आठवडयांनीं ह्यास फुलें येऊं लागतात. याला फुलें सदोदित महिना सव्वा महिनापर्यंत येतात; व फुलांमध्यें तऱ्हे-तऱ्हेचे रंग असतात. याचीं कलमेंही जगतात. याला खतमाती व

पाण्याचा बंदोबस्त नीट ठेवला तर हें बारमहा रहातें. याचीं कलमेंही जगतात.



**व्हरबीना**-याचें बीं जेथें पावसाळा फार असेल, तेथें अर्धा पावसाळा झाल्यावर पेरावें; व रोप चारसहा बोटें उंच झाल्यावर दीडदीड वितीचे अंतरावर चांगल्या खतावलेल्या जागेंत लावावें. याला फुलें बारमहा येतात. याचे फुलांचे रंग तांबडे, पांढरे, गुलाबी असे तऱ्हेतऱ्हेचे असतात. याचीं कलमें व जड जगतात. हें झाड वेलासारखें जमिनीबरोबर वाढणारें आहे.

**वालफ्लावर**-हें एक लहानसें फुलझाड आहे. हें पावसाळा संपल्यावर कुंड्यांत अगर जमिनींत लावणें असेल तेथें चांगलें कुजलेलें खत घालून हीं झाडें लावावीत. याला हिंवाळा चांगला मानवतो. यांत सिंगल व डबल अशा दोन जाति आहेत. याला फुलें तऱ्हेतऱ्हेचीं येतात. याला आठवड्यांतून एकदां पातळ खत देत जावें. याचें बीं पेरून रोप चारसहा बोटें उंच झालें म्हणजे लावावें. याच्या फुलास वास येतो.

**झेनीया**-हें झाड बहुतकरून या देशांत सर्व ठिकाणीं होतें. याची लावणी करण्यास विशेष खबरदारी घ्यावी लागत नाहीं. याला फार खताची गरज नाहीं, जेथें पाहिजे तेथें बीं लाविलें तरी चालतें.

**युका ग्लोरीओसा**-( घायतळाची जात ). यास पावसाळ्यांत एक मोठा तुरा येऊन त्यास पुष्कळ पांढरीं फुलें येतात, व यास मुळापाशीं पुष्कळ लहान लहान झाडें फुटतात. यास जमीन कशीही असली तरी चालते व यास पाण्याची विशेष गरज नाहीं.

**बोगनव्हेलिया**-हें झाड वेलासारखें वाढतें. याला उन्हाळ्यांत तांबूस रंगाचीं फुलें येतात, तेव्हां हें झाड सर्व तांबडेंच होऊन जातें. याचे जड जगतात व कलमेंही जगतात. याला अमुक प्रकारची माती पाहिजे असें नाहीं. लहान असतें तेव्हां पाण्याचा वगैरे बंदोबस्त ठेविला म्हणजे झालें. मोठें झाल्यावर यास आठवड्यांतून एकदां पाणी पुष्कळ मिळालें म्हणजे झालें, याला थोडथोडे कांटे असतात. याच्या दोन जाति आहेत, एकाचीं फुलें तांबूस रंगाचीं असतात. दुसरीं भगव्या रंगाचीं असतात.

**जरेनियम**-हें एक लहानसें कुंड्यांत वाढणारें झाड आहे. याला तांबूस, गुलाबी, पांढरीं अशीं तऱ्हेतऱ्हेचीं फुलें येतात. याला विशेष पाऊस सोसत नाहीं. याचीं कलमें जगतात. पेलार्गोनियम म्हणून यांतच एक जात आहे, त्याचीं फुलें एकेरी असतात. कांहींना फुलांचे झुबकेचे झुबके येतात व कितीएकांचें पानाला वाटोळें तांबूस रंगाचें चक्कर असतें व कांहींचीं पानें पांढरीं असतात. जरेनियमपेक्षां पेलार्गोनियम फार नाजूक आहे.

**ड्यूरेंटा**—हें लहानसें वाढणारें कांटेरी फुलझाड आहे. याला कांटे असतात. याच्या दोन जाति आहेत. एकाला निळीं फुलें येतात व एकास पांढरीं फुलें येतात. पांढऱ्यास कांटे फार नसतात. याचे फुलांचे तुरे तोडलेले एकेक दिवससुद्धां फुलें गळल्याशिवाय राहतात. याला पिवळे फळाचे घोंसचे घोंस येतात व ते फार सुरेख दिसतात, व याचे जडही जगतात. हें झाड सरासरी पुरुष सव्वापुरुष उंच वाढतें. याला

कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. पाण्याच्या आश्रयाला हें झाड लावावें. हें झाड पुष्कळ वर्षेपर्यंत टिकतें.



**गार्डेनियाफ्लोरिडा**—( डिकेमाली ) हें मोठें वाढणारें झाड आहे. याचीं फुलें पांढरीं असतात, व त्यांस वास असतो. हीं झाडें बियापासून अगर जडापासून होतात याचीं पानेंही सुरेख हिरवींगार दिसतात. याच्या चिकाची डिकेमाली होते. हें लहान असते तेव्हां याला पाण्याला जपलें म्हणजे झालें. मोठेंपणीं यास विशेष पाण्याची गरज नाहीं. हें झाड कोणच्याही जमिनींत होतें.

**ओलियाफ्रेग्रन्स**-हें एक बरेंच उंच वाढणारें झाड आहे, म्हणजे सुमारें पुरुष सव्वा पुरुष उंच वाढतें. हें लौकर होत नाहीं. याला फुलें फार बारीक येतात. ह्यांना फार गोड वास येतो. हें झाड लहान असलें तरी याला फुलें येतात. याला पाणी विशेष पाहिजे. याची जडापासून झाडें होतात. याला फुलें बहुतकरून बारमहा असतात.

**जट्रोफा**-हें एक लहानसें झाड आहे. याचीं पानें वाटोळीं असून कातरलेलीं असतात. यास फुलें तांबड्या रंगाचीं येतात. हीं झाडें बियांपासून होतात. यांत दुसरी एक जात आहे त्याचीं पानें कातरलेलीं नसतात. फुलें मात्र वर लिहिल्याप्रमाणें असतात. हें झाड बुडापाशीं मोठें पोसतें.

**व्हायोलेट**–हें अगदीं लहान कुंडयांत वाढणारें झाड आहे. याचीं पानें ब्रम्हीसारखी कांहींशीं वाटोळीं असतात. यामध्यें दोनतीन जाति आहेत. कांहींना पांढरीं फुलें येतात. कांहींना निळीं एकेरी येतात व कांहीं-ना दुहेरी निळ्या रंगाचीं फुलें येतात, यांना मधूर वास असतो, यांना कधीं कधीं बीं येतें; परंतु या झाडाच्या बुडाशीं आणखी झाडें फुटतात. यांना माती रेताळ असावी व ज्या कुंडयांत लावावयाचीं तो कुंडा फार खोल नसावा, उथळ असावा व याला फार ऊन व फार सावलीही उपयोगी नाहीं. यांना एक दिवसाआड पाणी द्यावें.

**आरचीड**–( रूकशांग ) या झाडास मातीची गरज लागत नाहीं. हें जिवंत झाडावर शेवाळ लाऊन बांधलें असतां चांगलें होतें. याचें पो-षण हवेंतून होतें, आणि उन्हाळ्यांत दिवसांतून एक वेळ पाणी दिलें असतां चालतें; परंतु पाऊस पडण्याचे सुमारास दोन वेळ पुष्कळ पाणी द्यावें. कारण त्या वेळेस यास फुलें येण्याचे दिवस असतात. यास फु-लाचा घोंस येतो. याचे फुलाचा रंग पांढरा असतो व त्या पांढरे रंगांत थोडा तांबडे रंगाचा शिटकाव असतो, व कांहीं फुलें पिवळीं असतात. याच्या जाति पुष्कळ आहेत. हीं झाडें खंडाळा, महाबळेश्वर व कित्येक ठिकाणीं जंगलांत झाडावर सांपडतात, परंतु याच्या जाति ब्रम्हदेशांत फार उत्तम मिळतात.

**पिवशी**–हें लहानसें नाजूक फुलझाड आहे. हें जेथें पुष्कळ पाऊस असतो व हवा थंड असते तेथें चांगलें होतें. याला तांबडी माती चांगली मानवते. यांत पुष्कळ जाति आहेत. कांहींचीं फुलें लांबोळीं असतात, कां-हींचीं वाटोळीं असतात. त्याच्या पाकळ्यांचा रंग निळा असतो. झाडावर हीं फुलें घोसासारखीं लोंबत असतात तेव्हां हें झाड मोठें सुरेख दिसतें. याचीं कलमें जगतात.

**टंटणी**–याच्या जाति पुष्कळ आहेत. ह्यास पांढरीं, गुलाबी पिवळीं व शेंदरीं अशीं तऱ्हेतऱ्हेच्या रंगाचीं फुलें येतात. हीं झाडें बियापा-

सून होतात व कलमेंही जगतात. यांना वास थोडासा उग्रट येतो. पांढ-ध्या टणटणीच्या फुलास रात्रीं मधूर वास येतो.

**लेजिस्ट्रोमा इंडिका** ( गुलमेंदी )–हें एक सुरेख लहानसें झाड आहे. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. परंतु तांबडी माती यास विशेष मानवते. याच्या दोनतीन जाति आहेत. एका जातीस गुलाबी रंगाचे तुरे येतात व दुसरीस पांढरे जातीचे तुरे येऊन फार नाजूक व सुरेख दिसतात. तिसरीस निळ्या रंगाचे फुलाचे तुरे येतात. हीं झाडें बियापासून होतात. याचीं कलमें व जड जगतात. याला फुलें बहुतकरून बारमहा येतात. हें झाड मोठें झाल्यावर आठवड्यांतून एक वेळ पाणी दिलें असतां पुरतें.



**मुरिया एक्झाटिका** ( बाक्सप्लांट )–हें एक लहानसें वाढणारें झाड आहे. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. याचीं पानें कांहींशीं कवठीच्या पानासारखीं असतात. याला आठवड्यांतून दोनदां पाणी दिलें म्हणजे पुरतें. याला पांढरीं फुलें येतात व फुलांना वास उत्तम येतो. याचीं बियापासून झाडें होतात व जडापासूनही होतात. हें झाड जेव्हां पुष्कळ फुलतें, त्या वेळेस हातरुमाल भिजवून फुलांवर घातला असतां त्या रुमालाचा वास दुसरे दिवसपर्यंत जात नाहीं.

**क्यालाडेन्ड्रन**–हे दोनतीन हात वाढणारें फुलझाड आहे. हें कुंड्यांत होतें व जमिनींत लाविलें तरी होतें. याच्या दोनतीन जाति आहेत. कांहींना झुपक्यासारखा पांढरा मोठा तुरा येतो. याचीं पानें वाटोळीं असतात. दुसरें त्यासारखेंच झाड असतें परंतु त्याला फुलें लाल येतात आणि एक प्रकारचें क्यालोडेन्ड्रन आहे, त्याचे फुलाचे तुरे खालीं लोंबत असतात व पानें लांबोळीं असतात याला आठवड्यांतून तीनदां पाणी दिलें असतां पुरें होतें. याचें जड जगतात व कलमेंही जगतात.

**आलामेंडा**–हें एक लहानसें वेलासारखें वाढणारें झाड आहे. हें कोणत्याही चांगल्या जमिनींत होतें. यास पावसाळ्यांत पुष्कळ पिंवळीं फुलें येतात. याचीं कलमें जगतात. याच्या दोन जाति आहेत. एकाला फुलें मोठीं येतात व एकाला लहान येतात. याला आठवड्यांतून तीनदां पाणी दिलें असतां पुरतें.

**एक्झोरिया**–हें लहानसें एक फुलझाड आहे. यांत दोन जाति आहेत. एकाला पांढरीं फुलें येतात व एकाला तांबडीं येतात. याच्या फुलाला बहुतकरून चारचार पाकळ्या असतात. याला विशेष पाण्याची गरज नाहीं. आठवड्यांतून दोनदां पाणी दिलें तरी चालतें. याला तांबडी माती चांगली मानवते. याला तांबडीं फळें येतात, तीं खाण्याला गुळचट लागतात. पांढऱ्या फुलाच्या झाडाची साल फार पौष्टिक आहे असें म्हणतात.

**रुसेलिया जुनेसा**–हें एक लहानसें गवतासारखें वाढणारें झाड आहे. यास बहुतकरून बारमहा फुलें येतात. तीं तांबडे रंगाचीं असतात. याचीं कलमें व जड जगतात.

**मालपेजिआ कॉसिफेरा**–हें एक लहानसें झाड आहे. यास गुलाबी रंगाचीं फुलें पावसाळ्यांत व हिंवाळ्यांत पुष्कळ येतात; हें कोणत्याही चांगल्या जमिनींत होतें. याचे जड जगतात.

**आब्युटुलान**–हें एक भेंडीसारखें वाढणारें लहानसें झाड आहे. यास तांबूस रंगाचीं लहान फुलें येतात, व त्या फुलांस आंतून पांढऱ्या

रेघा असतात. याचीं कलमें जगतात. यांत दुसरी एक जात आहे, त्यास सफेत पांढरीं फुलें येतात. या झाडाला पाणी फार सोसत नाहीं. हें कोणच्याही जमिनींत लाविलें तरी होतें.



**रोझ** ( गुलाब )–गुलाब हें झाड हिंदुस्थानाच्या कोणत्याही उष्ण प्रदेशांत होतें; परंतु जेथें पावसाळा फार असतो तेथें ह्याच्या बुडाशीं पाणी न जमण्याविषयीं फार जपावें. गुलाबामध्यें चार जाति आहेत. त्यांपैकीं दोन मुख्य सांगितल्या आहेत. त्यांतून एक " हायब्रेड परपेचुअल " या जातींतले गुलाब बहुतकरून लाल रंगाचे असतात. यास चैत्र वैशाख मासीं खच्ची करावें लागतें. दुसऱ्या जातीस " टिसेंटेड " म्हणतात. या जातीचे गुलाबास थोडासा वास असतो, परंतु आपल्या गांवठी गुलाबासारखा नसतो. यासही खच्ची याच महिन्यांत करावें लागतें. परंतु याच्या खांद्या व शेंडे थोडे थोडे कापावे लागतात. यास पातळ खत विशेष मानवतें.

---

## हायब्रेड परपेचुअल गुलाबांपैकीं.

**आलफ्रेड डी रोगमांट**–ह्या गुलाबास लाल आबाशाई रंगाचें मोठें फूल येतें.

**ब्लाकप्रिन्स**—या गुलाबास फूल फार मोठें लाल असून थोडी जांभळ्या रंगाची झांक मारते.

**बोलडीनेज**-या गुलाबाचें फूल पांढरें असून थोडी गुलाबी झांक मारते, व याचा आकार फार सुरेख असतो.

**क्यारोलाईन डी सेनसल**-या गुलाबाचें फूल मोठें असून भगव्या गुलाबी रंगाचें असतें.

**चार्लस बालटेड**-या गुलाबास फूल लाल येतें व याचा आकार फार सुरेख असून थोडासा वास असतो.

**जनरल जाक्कि मिनॉट**-याचें फूल लाल भडक असून मोठें असतें.

**लॉ फ्रान्स**-या गुलाबास गुलाबी रंगाचें फूल येतें व ह्याच्या पाकळ्या फार मोठ्या असून फूल फार मोठें असतें व यास थोडा वास येतो.

**लॉर्ड रेगलेन**-या गुलाबाचें फूल तांबडें असून मोठें असतें व जांभळी झांक मारते.

**मेडम् बॉल**-या गुलाबाचें फूल मोठें असून गुलाबी रंगाचें असतें व याच्या पाकळ्या थोड्या लॉ फ्रान्सपेक्षां जाडी असतात. यास वास येतो.

**मिसेस व्हिच**-या गुलाबाचें फूल गुलाबी असून फार मोठें असतें.

**ग्लोरीडी डायजन**-या गुलाबाचें फूल गुलाबी असून थोडी तांबूस झांक मारते व त्यास थोडा वास येतो.

**व्हिकटर व्हरडियर**-या गुलाबाचें फूल तांबूस गुलाबी रंगाचें असून फार मोठें असतें.

**पॉल्व्हरडियर**-या गुलाबाचें फूल लाल असून फार मोठें असतें. याचा आकार फार सुरेख असतो.

**लॉर्ड मेकाले**-या गुलाबाचें फूल फार मोठें असून अतिशय लाल असतें.

**मिसेस चार्लस वुड**-याचें फूल मोठें असून तांबडी झांक असते.

**पालनेरान्**-या गुलाबाचें फूल फारच मोठें असून गुलाबी रंगाचें असतें. या फुलासारखें दुसऱ्या गुलाबाच्या जातींत मोठें फूल नाहीं.

## टिसेटेंड गुलाबांपैकीं.

**आब्रीकॉट**-या गुलाबाचें फूल थोडेंसें पांढरें असून आंतील भाग थोडा पिंवळा असतो.

**आरकीमीड**-या गुलाबाचें फूल गुलाबी रंगाचें असून मोठें असतें.

**बेललायनी**-या गुलाबाचें फुलाचा रंग कांहींसा पिकलेल्या लिंबा-प्रमाणें असतो; व फुलास थोडा वास येतो.

**क्यापटन ख्रिस्ती**—या गुलाबाचें फूल मोठें असून रंग थोडा गुलाबी असतो, व फुलाचा आकार फार सुरेख असतो.

**क्लाथ आफ गोल्ड**-याचें फूल पिंवळें असतें व थोडी पांढुरकी झांक मारते, व फूल मोठें असतें.

**लेमार्क**-याचें फूल पांढरें असून पिंवळी छाया मारते. हा गुलाब वेलीसारखा होतो.

**म्याडम क्यामेली**-या गुलाबाचें फूल गुलाबी रंगाचें असून अतिशय नाजूक असतें.

**म्याडम फालकट**-या गुलाबाचें फूल पिंवळें असून थोडी तांबूस झांक मारते.

**म्याडम पोलाईन लेबांट**-या गुलाबाचें फूल नाजूक असून गुलाबी रंगाचें असतें, व फूलही फार मोठें असतें.

**मारशेलनिल**-या गुलाबाचे फुलास थोडा वास असतो, व फूल फार पिंवळें असतें. या सारखें गुलाबाचे जातींत दुसरें पिंवळें फूल नाहीं.

**म्यारीबॉन हुट**-याचें फूल थोडें पिंवळें असून पांढरी झांक मारते. बाहेरील पाकळ्या थोड्या गुलाबी रंगाच्या असतात, व पुढें त्या फुलावर तांबूस ठिपके उठतात.

**नेफीटॉस**-या गुलाबाचें फूल सफेत पांढरें असून कळी फार सुरेख दिसते.

**रेन डी पोर्चुगाल**-या गुलाबाचें फूल पिंवळें असून थोडी तांबडी झांक मारते. या फुलाचा रंग उत्तम सोन्याच्या रंगाप्रमाणें असतो.

**परफेक्शन् डी मॉंटप्लेझर**-याचें फूल साधारण आकाराचें असून पिंवळें असतें.

**स्विट ब्रायर**-या गुलाबास फुलें कधीं कधीं बारीक पांढरीं येतात, परंतु याच्या पानास वास उत्तम येतो.

**हिरवा गुलाब**-याचें फूल हिरवें असतें, त्यास वास नसतो. बाकी सारी आकृति बहुतेक गुलाबासारखी असते.

---

## कांद्यांपासून होणारीं विलायती फुलझाडें.



**डेलिया**-हें लहानसें कांद्यापासून होणारें फुलझाड आहे. या झाडाचे कांदे कांहींसे रताळ्यासारखे असतात. याच्या फुलांचे रंग पुष्कळ तऱ्हेचे असतात. हे कांदे चैत्रवैशाखीं आपोआप फुटूं लागतात, त्या वेळीं कोंम राखून बेतानें बटाटयासारखे कापले असतां एका कांद्याचे दोनतीन किंबहुना चारही तुकडे करितां येतात व तो एकेक तुकडा कुंड्यांत ख-

तावळलेल्या मातींत लावावा आणि त्या कुंड्यास महिनाभर रोज पाणी देत जावें व हे कांदे नवीन लाविले असतां फार कडक उन्हांत न ठेवितां झाडाच्या सावली खालीं जेथें फार ऊन न लागे अशा ठिकाणीं ठेवावेत. पुढें उन्हाळा संपल्यावर पावसाळा लागतांच ते कुंडे उन्हांत ठेवावेत आणि त्यांस रोज पाणी न घालतां एक दिवसाआड घालावें व कुंड्यांत पावसाचें पाणी न सांचेल अगर तो कुंडा सारखा ओला न राहील अशी तजवीज ठेवावी. फार पाणी झालें असतां हा कांदा कुजून झाड मरतें. याला आश्विन अखेरपर्यंत पुष्कळ फुलें येतात. तीं फुलें तऱ्हेतऱ्हेचीं असल्या कारणानें हें झाड फार सुरेख दिसतें. हें झाड फुलत असतें तेव्हां पातळ खत महिन्यांतून दोन वेळां देत जावें व वाढल्यावर कुंडा खुरपावा. कार्तिक महिना लागला म्हणजे याचें पाणी तोडावें म्हणजे असें आठवड्यांतून एकदां व पंधरा दिवसांतून एकदां थोडथोडें पाणी द्यावें. असें केलें म्हणजे वरील झाड हळू हळू वाळत जातें व वाळल्यावर वरचें झाड तोडून टाकून खालचा कांदा कुंड्यांतून काढून रेती व दुसरी बारीक माती मिसळून ते कांदे एकादे कुंड्यांत किंवा टिपांत भरून सावलींत ठेवावे आणि पाणी घालूं नये.

---



**ग्लॅडिओलस**--हें एक कांद्यापासून होणारें फुलझाड आहे. याला पावळा लागण्याचे सुमास कोम येऊं लागतात. त्या वेळेस कुंड्यांत खत माती घालून एकेक कांदा लावावा आणि हें झाड वाढूं लागलें म्हणजे याला काठ्या बांधाव्या. याला आठवड्यांतून एकदां पातळ खत देत जावें म्हणजे याला फुलाचा लांबच लांब तुरा येतो. याच्या फुलाचे रंग तांबडा, पांढरा, गुलाबी, किरमिजी वगैरे तऱ्हेतऱ्हेचे असतात. याला एकदां तुरा आला म्हणजे पुन्हा त्याचवर्षी फुलें येत नाहींत. हा तुरा पंध-रा दिवस फुलत असतो. त्याच्या फुलाचा बार झाला म्हणजे तो कुंडा एकीकडे उचलून ठेवावा, कारण तें झाड पुष्कळ दिवसपर्यंत तसेंच टवटवीत राहतें. याला पाऊस नसेल तेव्हां आठवड्यांतून दोनदां पाणी देत जावें म्हणजे तें झाड हळू हळू आश्विन व कार्तिक या महिन्यांत मरतें. तें मेल्यावर कुंडा पालथा करून त्यांतला कांदा काढून त्याच्या सभोंवतीं बारीक बारीक पिलें सांपडतात, नंतर तो मोठा कांदा व बारीक बारीक कांदे रेतीमध्यें घालून ठेवावे आणि पाणी देऊं नये. पुढें पाऊस पडण्याच्या सुमारास वर सांगितल्याप्रमाणें लावावे.



**आकीमीनीस**—हे कांदे आहेत, हे पावसळा लागण्याचें सुमारास फुटूं लागतात, त्या वेळेस ते कुंडयांत बदलावेत. नंतर पावसाळ्यांत त्यांस फुलें येऊं लागतात, तीं पांढरीं, तांबूस व निळ्या रंगाचीं असतात. पुढें ते आश्विन मासीं मरूं लागतात; नंतर त्याचें पाणी हळू हळू कमी करीत जावें व यास सावलींत ठेवावें.

**आमारीलीस**--हा एक कांदा आहे. याच्या फुलांचा रंग भगवा व लाल असतो. यास फुलें हिंवाळ्यांत येतात. हे कांदे दोनदोन वर्षेपर्यंत जरी जागचे जागीं खणले नाहीं तरी बिघडत नाहीं. ह्या कांद्यालाच दुसरे बारीक बारीक कांदे फुटतात. यांना खत, माती व पाण्याला जपलें तर फुलें मोठीं येतात.

**ग्लोरिओसा सुपरबा**–( कळलावी ). हा एक कांदा आहे. याचे वेलास पावसाळ्यांत फुलें येतात. हा उन्हाळ्यांत मरूं लागतो. याचा कांदा विषकारक आहे. याच्या झाडाला किडीचा उपद्रव फार होतो. याचें झाड वेलीसारखें वाढतें म्हणून याला काठया लावाव्या लागतात. याला बीं केशरीच्या बियासारखें बारीक बारीक येतें व त्यापासून पुष्कळ झाडें करितां येतात. याचीं फुलें केशरी रंगाचीं असून थोडी तांबडी झांक मारते.

**झीफ्रांथीस**–हा एक कांदा आहे. याचीं पानें बारीक असतात. यास फुलें बहुतकरून बारमहा येतात, तीं बहुतकरून गुलाबी रंगाचीं असतात. " झीफ्रांथीस टयुबीस फेथा " म्हणून याची एक जात आहे, त्यास बारीक गवतासारखीं पानें असतात, व फुलें पांढरीं येतात. याच्या कांद्याला दुसरे कांदे फुटतात. याला पाणी विशेष लागतें, फुलझाडाचे जे ओटे केले असतात त्याच्या सभोंवतीं लावले असतां हे फार सुरेख दिसतात.



**क्रायनम**–( सापकांदा. ) हा एक कांदा आहे. याला बोट वीत बोट रुंदीच्या पाता लांब लांब येतात व यांतून मध्यें एक दांडा निघतो. त्याला पांचसहा फुलें असतात, त्याचा रंग सफेत पांढरा असतो. या कांद्याला कांदा फुटतो. याला पाणी विशेष लागतें. हे कोणच्याही जमिनींत लाविले तरी होतात.

**टयूबरोझ**––(गुलछबू)यास निशीकंद असें म्हणतात. हा एक कांदा आहे. याचें झाड हात दोन हात उंच वाढतें. याला शेवटीं फुलांचा तुरा येतो, त्याला जवळ जवळ फुलें पुष्कळ असतात. याचे फुलाचा रंग पांढरा असतो.

यामध्यें दोन जाति आहेत. एक एकेरी व दुसरी दुहेरी. दुहेरी गुलछबूला हजारी गुलछबू म्हणतात. याची बाहेरील पाकळी थोडी तांबडी असते. याच्या फुलाला दिवसापेक्षां रात्रीं वास पुष्कळ सुटतो. याला जमीन कोणच्याही प्रकारची असली तरी चालते. याला पाणी विशेष पाहिजे. याच्या कांद्याला खालीं पुष्कळ कांदे फुटतात. हे निराळे केले असतां पुष्कळ झाडें होतात. हे पावसाळ्यांत पुष्कळ फुलतात, परंतु याला पाणी असलें म्हणजे यास बारमहा फुलें येतात.

**जेसनेरा**—हें एक मखमलीचें कापडाप्रमाणें पानें येणारें झाड आहे. याचीं फुलें पिंवळे रंगाचीं असतात, याच्या पानाचीं कलमें जगतात व याला छायेची जागा पाहिजे. पावसाळ्याचे चार महिने गेल्यावर हें झाड आपोआप मरूं लागतें, मेल्यावर तोच कुंडा सावलींत ठेवावा; नंतर पावसाळा लागण्याच्या सुमारास तो कुंडा पालथा करावा, त्या एका कुंडयांत चारपांच कांदे सांपडतात, ते काढून पुढें लहान लहान कुंडयांत खत माती घालून एकेक कांदा लावावा.

**युक्यारीस अमेझानीका.**—हा एक कांदा आहे. याला सफेत पांढरीं सुवासिक फुलें येतात. याचें पौषापासून वैशाखपर्यंत पाणी कमी करावें; परंतु त्याची माती अगदीं वाळूं देऊं नये, नंतर मृगाचे सुमारास पाणी पुष्कळ देऊं लागावें, म्हणजे कांदे पुन्हा वाढूं लागतात. या एका कांद्याला दुसरे कांदे फुटतात. याला पावसाळ्यांत घुल्यासारखा काळा किडा याच्या पानावर पडतो, त्या वेळेस जपावें, नाहीं तर तो कांदा खाऊन टाकितो.

**आगापँथस**—हा एक फुलें येणारा कांदा आहे. हा कांदा सुमारें हात दीड हात उंच वाढतो. याच्या पाती दोन बोटें रुंद असून हात हात लांब असतात. हे कांदे कुंडयांत अगर खतावलेल्या जमिनींत लाविले असतां चांगले होतात. याला निळ्या फुलाचे तुरे येतात, तेव्हां हें झाड फारच सुरेख दिसतें. याच्या कांद्याला कांदे फुटतात, त्यापासून

पुष्कळ झाडें होतात. याला फार ऊन व फार सावली सोसत नाहीं, याला आठवड्यांतून दोनदां पाणी दिलें म्हणजे पुरे होतें. याला फुलें येण्याचे दिवस म्हटले म्हणजे ज्येष्ठ व आषाढ हे महिने आहेत.



**ग्लॉकसीनिया**--हें कांद्यापासून होणारें व कुंड्यांत वाढणारें लहानसें झाड आहे. याला गुलाबी रंगाचीं फार सुरेख फुलें येतात. या झाडाला ऊन फार सोसत नाहीं. याच्या एका कांद्यापासून पुष्कळ कांदे होतात. याला कुजलेल्या पाल्याचें खत चांगलें मानवतें. याला पाणी दररोज थोडें थोडें घातलें पाहिजे व पुष्कळ पाऊस पडत असला तर या झाडाचे कुंडे पावसांतून एकीकडेस ठेवावेत. कारण याला पाणी विशेष सोसत नाहीं. याचीं पानें फार नाजूक असतात, सबब पाणी घालतेवेळेस पानावर न पडूं देण्याविषयीं खबरदारी ठेवावी. याचे कुंडे सावलीची व गारठ्याची जागा असेल तेथें ठेवावेत.

---

## स्वदेशीय फुलझाडें.

**खरा गुलाब**-याचीं फुलें बहुतेक बसरी गुलाबासारखींच असतात; पण थोडीं लाल रंगाचीं असतात. याला वास अत्तरासारखा येतो, म्हणून याच्या फुलाचें अत्तर करितात, गुलाबपाणी करितात व गुलकंदही करितात. याचीं कलमें जगतात, परंतु बसरी गुलाबासारखीं जगत नाहींत. याला हिंवाळ्यामध्यें खच्ची करितात, याला कांटे फार असतात व याला उन्हाळ्यांत एकदां बार येतो.

**बसरी गुलाब**-हा या देशांत कोणच्याही जमिनींत होतो. याला फुलें बारमहा येतात व याच्या फुलास थोडा वास असतो. याचीं कलमें जगतात. याला हिंवाळा संपतांना खच्ची करावें व खतमाती दिली म्हणजे पुष्कळ खांद्या फुटून पुष्कळ फुलें येतात. हें बेट एक ठिकाणीं दहादहा वर्षें सुद्धां राहतें. याला आठवड्यांतून तीनदां पाणी द्यावें.

**अनंत**-हें लहानसें तगरी येवढें वाढणारें झाड आहे. हें तांबड्या जमिनींत व काळ्या जमिनींतही होतें; परंतु तांबडी माती असली तर फार चांगली. हें लावते वेळेस अशी जागा पहावी कीं, त्याला सदोदित पाणी मिळेल, ऊन फार लागणार नाहीं, अशी गारव्याची जागा पाहून लावावें. लावतेवेळेस कुजलेला राखुंडा, गुराचें शेण, कचरा, जुनें खत असेल तें घालावें. ताजी घोड्याची लीद किंवा उष्ण कोणतेंही खत घालूं नये, घातलें असतां झाड मरेल. याला फुलें चैत्र वैशाख महिन्यांत व पावसाळ्यांतही येतात. याच्या फुलाचा आकार कांहींसा दुहेरी तगराच्या फुलाप्रमाणें असतो; परंतु तगरीपेक्षां याच्या फुलाच्या पाकळ्या, देंठ व आकार मोठा असतो. फुलाला वास पुष्कळ येतो. याचीं झाडें जडापासून होतात व कलमेंही जगतात.

**कांटे शेवती**-हें झाड गुलाबाच्या झाडासारखेंच वाढणारें आहे. हें समोर नीट न वाढतां वेलीसारखें वाढतें. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते; परंतु चिखलाची जागा अगर पावसाचें पाणी सांचून राहील अशी जागा नसावी. झाड अशा ठिकाणीं लावावें कीं, दिवसांतून याला अर्धा दिवस तरी ऊन मिळेल अशी जागा पाहून लावावें. लावते वेळेस थोडेंसें कुजलेलें खत घालावें. ज्या वेळेस याची नवीन लागण केली असेल तेव्हां याजला महिनाभर रोज पाणी द्यावें. पुढें आठवड्यांतून याजला दोन वेळ पाणी पुष्कळ दिलें म्हणजे पुरें होतें. याला चैत्रवैशाखीं फुलें येतात, तीं कांहींशीं गुलाबासारखींच असतात. परंतु गुलाबापेक्षां लहान असतात. सभोंवतीं पांढरें असून मध्यें पिंवळें असतें. याचीं पानें गुलाबासारखींच थोडीं लांबोळीं असून पातळ असतात.

याचीं कलमें जगण्यास थोडा आयास पडतो; परंतु जडापासून हीं झाडें लौकर होतात.



**जास्वंद**-हें झाड सुमारें तीनचार हात उंच वाढतें. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. याला पाणी मात्र विशेष पाहिजे. याच्यामध्यें पुष्कळ जाति आहेत. एकेरी जास्वंदीचें फूल मोठें असून लाल असतें, व याचीं पानें बहुतेक वाटोळीं असून थोडीं कातरलेलीं असतात. दुहेरी जास्वंदाचीं पानें वरच्यासारखींच असून थोडीं लहान असतात व फूल मोठें असून पाकळींत पाकळ्या अशा पुष्कळ असतात. फुलाचा रंग लाल असतो. दुसरी एक एकेरीच जास्वंद आहे, तिचें फूल एकेरी फुलासारखेंच असून त्याचा रंग बहुतेक पिवळा असतो. पांढऱ्या जास्वंदीचें फूल एकेरीच आहे, परंतु फूल जवळ जवळ पांढरें असून त्यांत थोडी पिवळी झांक मारते. याचीं पानें तांबडया एकेरी जास्वंदीपेक्षां थोडीं लहान असतात. हिच्या मुळ्या उष्णता झाली असतां उगाळून त्यांत खडीसाखर घालून खातात. निळी जास्वंद-हिच्या फुलाचा रंग निळा असून फुलाचा आकार तांबडया एकेरी जास्वंदीसारखाच असतो. एक पांढरी जास्वंद आहे, हिचें फूल सफेत पांढरें असतें, व हें तगरीच्या फुलासारखें कांहींसें दिसतें. ह्याला पाकळ्या पुष्कळ असतात. ह्याचीं पानें एकेरी पांढऱ्या जास्वंदीपेक्षां कांहीं लहान असतात. दुसरी एक

एकेरी तांबडीं फुलें येणारी जास्वंद आहे, तिचीं पानें लहान व लांबोळीं असून अर्धीं तांबडीं व अर्धीं हिरवीं व कांहीं पांढरे टिपके अशा तऱ्हेचीं असतात. हें झाड मोठें सुरेख दिसतें. एक गेंाड्याची जास्वंद आहे, तिचीं पानें एकेरी पांढऱ्या जास्वंदीसारखींच असतात, परंतु फुलें तांबड्या रंगाचीं असतात व फुलाच्या पाकळ्या जाळीदार कापलेल्या असतात; त्या पाकळ्या उलट्या देंठाकडे फिरलेल्या असतात व आं- तील भाग गेंाड्यासारखा खालीं लोंबत असतो. ह्याचें फूल फार सुरेख दिसतें. याचीं झाडें जडापासून होतात व कलमेंही जगतात.

**तगर**–हें झाड लहानसें दोनतीन हात उंच वाढणारें आहे. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. याला पाणी मात्र विशे- ष पाहिजे. याला फुलें बहुतकरून बारमाही येतात, परंतु आषाढ व श्रावण या महिन्यांत फुलें पुष्कळ येतात. यांत दोन जाति आहेत, एक एकेरी फूल येणारी व दुसरी दुहेरी फूल येणारी. याच्या फुलाचा रंग सफेत पां- ढरा आहे. जेव्हां हें झाड फुलतें तेव्हां हें सगळें सफेत पांढरें दिसतें. याला थोडासा मधूर वास असतो. याचीं झाडें जडापासून होतात व क- लमेंही जगतात.

**नागचांफा**–हें मोठें वाढणारें झाड आहे. या झाडाला तांबडी माती विशेष मानवते. याला पाणी विशेष पाहिजे. हें झाड जेथें हवेमध्यें ओला- वा आहे म्हणजे समुद्रकिनाऱ्च्या प्रदेशांत चांगलें होतें. याला फुलें येण्या- ला नऊदहा वर्षें लागतात. याचीं फुलें राकडीसारखीं वाटोळीं असतात. त्याच्या पाकळ्या पांढऱ्या असून आंत वळलेल्या असतात व फुलां- त केशरासारखे बारीक बारीक तंतू असतात. या फुलाचा वास अप्रतीम आहे म्हणजे हें फूल वाळवून कपड्यांत वगैरे ठेविलें असतां कपड्यास देखील सुवास सुटतो. याचीं पानें कांहींशीं कोकंबाच्या पाना- सारखीं असून लांबोळीं असतात. याचें बी ताजेपणीं लाविलें तरच उगव- तें, वाळलें तर उगवत नाहीं. याच्या बियाचें तेल काढितात. हें झाड चैत्र

वैशाखीं फुलतें. याला सुगंध फार असल्याकारणानें याच्या फुलाच्या वासाला नाग वगैरे फार लुब्ध होतात.

**पारिजातक**-हें मोठें वाढणारें झाड आहे. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. याला लहानपणीं पाण्याविषयीं जपलें म्हणजे झालें. याला फुलें झाड लावल्यापासून तिसऱ्या वर्षी येऊं लागतात. श्रावण व भाद्रपद या महिन्यांत याला फुलें पुष्कळ येतात. या झाडास जर नेहमीं पाणी मिळत असलें तर बहुतकरून बारमहा यास फुलें येतात. हें फूल फार नाजूक आहे. फूल पुढें पांढरें असून मागें देंठ तांबडा असतो. संध्याकाळीं जेव्हां या कळ्या उमलूं लागतात तेव्हां फार सुगंध सुटतो. याचीं झाडें जडापासून होतात, कलमापासून होतात व बियापासूनही होतात.

**बटमोगरा**-हें कांहींसें वेलासारखें वाढणारें लहान झाड आहे. हें कोणच्याही जमिनींत होतें. लहान असतें तेव्हां याला रोज पाणी द्यावें लागतें; पुढें मोठें झाल्यावर आठवड्यांतून दोनदां पाणी द्यावें. माघ व फाल्गुन या महिन्यांत हें झाड सभोंवतीं खणून कुजलेलें खत घालावें आणि आळें करावें व त्याच्या वाळलेल्या खांद्या व लांबलांब गेलेले वेल थोडे छाटून टाकावे, आणि त्याला पुष्कळ पाणी द्यावें. म्हणजे याला कोंवळे धुमारे फुटतील आणि चैत्र व वैशाख या महिन्यांत याला पुष्कळ फुलें येऊं लागतील. या झाडास फार सावली नसावी. याचे फूल लहानसें झेंडूयेवढें असतें. या फुलाचा रंग पांढरा असून पाकळींत पाकळ्या पुष्कळ असतात. फुलाला वास चांगला येतो. याचीं कलमें जगतात व जडापासूनही झाडें होतात.

**मोतिया**-याची लागवड बटमोगऱ्यासारखीच आहे. फूल मात्र लहान असून एकेरी असतें. फुलाला मधूर वास येतो.

**मोगरा**—याचीही लागवड बट मोगऱ्यासारखीच आहे. फूल मोतियापेक्षां थोडें लहान असतें. मोतियापेक्षां याचा वास थोडा उग्र आहे.

आहेत. परंतु या नेवाळीचें फूल कागड्यासारखें गुलाबी रंगाचें नसतें व कागड्यापेक्षां थोडें लहान आहे. या फुलाचा रंग सफेत पांढरा असतो. फुलाच्या वासांत थोडा फरक आहे. याची लागवड करणें तीही कागड्यासारखीच करावी.

**सुवर्णपुष्पी**—(सोनटका) ह्याचे आल्यासारखे कांदे आहेत. त्याच्या पानाचा आकार थोडाबहुत हळदीच्या पानाशीं मिळतो. हें झाड सुमारें डोकीभर उंच होतें. याला कोणचीही जमीन असली तरी चालते. त्याला पाणी पुष्कळ पाहिजे, म्हणजे याच्याखालीं सदोदित ओला वा राहील अशी जागा पाहिजे. यांत दोन जाती आहेत. एक पिंवळा व एक पांढरा. याला पावसाळ्यांत एक तुरा येऊन त्यांतून हीं फुलें निघतात. हा तुरा फुलूं लागला म्हणजे एकसारखा आठचार दिवस फुलत असतो. याच्या फुलाला फार वास येतो. याच्या बुडाशीं आल्यासारखे कोंब फुटतात, ते तोडून लाविले म्हणजे याचीं पुष्कळ झाडें होतात.

**सुरंगी**—हें मोठें वाढणारें झाड आहे. हें तांबड्या मातींत चांगलें होतें. हे लहान असतें त्या वेळेस याला पाण्याला जपलें म्हणजे झालें. ह्याला बारीक बारीक उंडणीच्या फुलासारखीं फुलें येतात. ह्या फुलाला वास फार चांगला येतो. हीं फुलें वाळवून ठेविलीं तरी याचा सहासहा महिनेपर्यंत वास जात नाहीं व हें कुसकरून उदबत्तीच्या मसाल्यांत घातलें म्हणजे उदबत्त्यांला फार चांगला वास येतो. हें झाड वाढण्याला फार दिवस लागतात. ह्याचीं झाडें बियापासून होतात. सुरंगीच्या फुलाचे गजरे करितात.

**हिरवा चांफा**—हें लहानसें वाढणारें झाड आहे. हें कोणच्याही जमिनींत होतें; परंतु काळ्या मातींत चांगलें होतें. याला लाविल्यापासून तिसऱ्या वर्षी फुलें येऊं लागतात व हीं फुलें कांहींशीं सिताफळीसारखीं व रामफळीसारखीं असतात; परंतु याला वास फार

मधूर येतो, सिताफळीसारखा व रामफळीसारखा उग्र येत नाहीं. व हें झाड कांहींसें वेलीसारखें वाढतें. याला बीं लहानशा बोरा येवढें येतें. हीं झाडें बियापासून होतात व जडापासूनही होतात. या झाडाला पाणी विशेष पाहिजे.

**सोनचांफा**—हें मोठें वाढणारें झाड आहे. हें तांबडया मातींत, काळ्या मातींत किंवा कोणच्याही जमिनींत होतें. याला लहानपणीं पाण्याला जपलें म्हणजे झालें. मोठेंपणीं यास पाण्याची विशेष जरूर नाहीं. याला लावल्यापासून पांचव्या सहाव्या वर्षीं फुलें येऊं लागतात. याचा फुलें येण्याचा हंगाम चैत्र वैशाख हे महिने आहेत. याचीं पानें दोन. तीन बोटें रुंद असून चारसहा बोटें लांब असतात. या झाडाचा स्वभाव बहुतकरून समोर वाढण्याचा आहे. फूल सुमारें तीनचार बोटें लांब असतें व फुलाचा रंग पिंवळा असतो. या फुलाचा वास चांगला असतो, परंतु थोडा उग्र आहे. हीं झाडें बियापासून होतात; परंतु हें बीं ताजें असलें तर उगवतें, नाहीं तर उगवत नाहीं.

**कंचन**—हें मोठें वाढणारें झाड आहे. लहान असलें म्हणजे यास पाण्याला जपलें म्हणजे झालें. मोठें झाल्यावर यास पाण्याची विशेष जरूरी नाहीं. यांत दोनतीन जाति आहेत. एका जातीला पांढरीं फुलें येतात व तीं बहुतकरून पावसाळ्यांत फुलतात. दुसरे जातीला गुलाबी फुलें येतात. हीं माघ व फाल्गुन या महिन्यांत फुलतात. याचीच एक दुसरी जात आहे, ती कांहींशी वेलीसारखी वाढते. याला पिंवळीं फुलें येतात. याचीं झाडें बियापासून होतात व झाड लावल्यापासून यास तिसऱ्याचौथ्या वर्षीं फुलें येऊं लागतात.

**कमळ**—याचे कांदे असतात. हीं झाडें तळ्यांत जेथें पाणी फार खोल नाहीं व ज्यांत खालीं पुष्कळ चिखल आहे अशाठिकाणीं होतात. यांत पुष्कळ जाति आहेत. कापूसकमळ म्हणून एक जात आहे, त्याचें फुल फार लहान आहे, व झाडेंही लहान असतात, म्हणजे वीत सव्वावीत

उंच असतात. हीं झाडें जेथें थोडें पाणी आहे, म्हणजे तळ्याच्याकांठीं अगर भाताच्या खाचरांत हीं पावसांत उगवतात. याचीं फुलें पांढरीं असून फार नाजूक असतात. तांबडीं कमळें व पांढरीं कमळें हीं पुरुष दोन पुरुष पाण्यांत होतात. याचीं पानें सुमारें फूट सव्वाफूट रुंदीचीं असतात. पांढऱ्यास चंद्रकमळ म्हणतात, हें रात्रीं फुलतें. तांबड्यास सूर्य-कमळ म्हणतात, हें दिवसा फुलतें. ह्या कमळांना बीं येतें, हें बीं बारीक नाचणी किंवा वरई या सारखें असतें. याचीं झाडें बियापासून होतात व कांदे लाऊनही होतात. याच सारखी दुसरी मोठीं तांबडीं व पांढरीं फुलें येणारी जात आहे. याच्या पानाची औरस चौरस रुंदी हात सवाहात असते. याला पोसर म्हणतात. याचें उलटें पान करून जेवण्याची वहिवाट आहे, सुलटे पानावर जेवलें असतां खाज लागते असें म्हणतात. याला बीं येतें, तें वजरबटूसारखें लांबोडें असतें. त्याला कमळ कांकडी असें म्हणतात. ह्यांच्या पांढऱ्या कोंवळ्या मुळ्यांची भाजी चांगली होते.

**निळें कमळ**—हें कापूसकमळापेक्षां थोडें मोठें आहे, हें खोल पाण्यांत होत नाहीं, जेथें हात दोन हात पाणी खोल असतें तेथें होतें. याचे फुलाचा रंग पांढरा असतो; परंतु आकाशाच्या रंगासारखी निळी झांक मारते. याला बीं येतें, तें बारीक नाचणी किंवा वरीसारखें असतें. याचीं झाडें बियापासून होतात व कांदे लाविले असतांही हीं झाडें होतात.

**सहस्र पाकळीचें कमळ**—हें फारसें आपल्या दक्षिण देशांत नव्हतें. हें लांबून आम्हीं आणून याचा पुष्कळ फैलाव केला आहे. याचे फुलाचा रंग सफेत पांढरा आहे. याचे फुलाचा कळा चांगला मोठा आला म्हणजे सोललेल्या नारळायेवढा असतो. या फुलांत पालखीच्या गोंड्या-सारखा शेंकडों तंतूंचा पिवळ्या रंगाचा घोंस असतो. या कमळाला अतिशय वास असतो, असा कोणच्याही कमळाला नसतो. याचें पान सुमारें दोन हात औरसचौरस रुंदीचें असतें. हीं कमळें वैशाख महिन्यां-

पासून आश्विन अखेर फुलत असतात. फूल गळल्यावर यांस बोंड येतें त्यांत काळ्या रंगाच्या बिया अर्धा अर्धा बोट लांबीच्या सांपडतात, याला कमळाक्ष म्हणतात. हे कोंवळेपणीं खाल्ले असतां फार स्वादिष्ट लागतात. वाळल्यावर याचें पीठ करून उपासास खातात. त्याच्या कोंवळ्या पांढऱ्या मुळ्यांची भाजी व भर्जी फार उत्तम होतात व मुळ्यांच्या चकत्या काढून त्याला तिखटमीठ लावून वाळवून ठेविल्या तर याचा सांडग्या सारखा उपयोग होतो.

**व्हिक्टोरियारिज्या**—या कमळासारखें तर मोठें कमळ कोणचेंच नाहीं. याचा साधारण फुलाचा कळा मोठयाशा नारळा येवढा असतो. याच्या पानाचा घेर दोनअडीच हात चौरसचौरस रुंदीचा असतो व पानें तांबूस रंगाचीं असून याच्या कडा ताटासारख्या वळलेल्या असतात. हें लांबून पाहिलें म्हणजे मोठयाशा ताटा सारखें दिसतें. परंतु हें पान आपल्या साध्या कमळासारखें चिवट नसतें; भाकरीसारखें जाडी असतें, परंतु ठिसूळ असतें. या कमळाचें येवढेंच वाईट आहे कीं, पानाच्या खालीं व देंठाला निवडुंगासारखे कांटे असतात. हें कमळ झाडाजवळ जाऊन काढितां येत नाहीं, काठीनें काढावें लागतें. हीं कमळें दक्षिण अमेरिकेंत मिसीसिपी नदीच्या धबधब्याजवळ आहेत. तिकडूनच ही जात नवीन आणलेली आहे.

**हादगा**—( अगस्ता ) हें मोठें वाढणारें झाड आहे. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. याच्या दोन जाति आहेत. एक तांबडें फूल येणारा व दुसरा पांढरें फूल येणारा. हें लावल्यापासून एक वर्षाच्या आंत यास फुलें येऊं लागतात. हें झाड लौकर वाढणारें आहे, त्याप्रमाणें हें फार दिवस टिकतही नाहीं, हें लौकर मरतें. हें झाड फार ठिसूळ आहे. याचीं फुलें संध्याकाळीं फुलतात. याच्या फुलाची भाजी होते, भर्जी होतात व शेंगाचीही भाजी होते. या शेंगा पित्तकारक

आहेत. ह्याची भाजी पुष्कळ दिवस खाल्ली तर रातांधळें लागतें असें म्हणतात. ह्याचीं झाडें बियापासून होतात व याला पाणी विशेष लागतें.

**कण्हेर**--हें एक लहानसें सुमारें तगरी येवढें वाढणारें झाड आहे. हें कोणच्याही जमिनींत होतें व सदोदित ओलावा राहील अशा ठिकाणीं लावावें म्हणजे झालें. याच्या पांचसहा जाति आहेत. पांढरी एकेरी, पांढरी दुहेरी, तांबडी एकेरी, तांबडी दुहेरी, भगवी एकेरी, भगवी दुहेरी. याच्या फुलांस थोडा वास असतो व ह्यास बहुतकरून बारमहा फुलें येतात. याचीं कलमें जगतात व जडही जगतात. याच्या मुळ्या विषकारक आहेत असें म्हणतात.

**गुलनार**--हें झाड डाळिंबी सारखें वाढतें व याची सर्व आकृति डाळिंबीसारखी आहे. याच्या फुलाचा रंग डाळिंबाच्या फुलासारखाच आहे; परंतु फुलें दुहेरी असून डाळिंबाच्या फुलापेक्षां मोठीं आहेत. यास फळें येत नाहींत. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. याला पाणी सदोदित असलें म्हणजे यास बारमहा पुष्कळ फुलें येतात.

**दुपारी**--हें लहानसें दोनतीन हात उंच वाढणारें झाड आहे. हें काळ्या मातीपेक्षां तांबड्या मातींत चांगलें होतें. याचीं पानें रुपया दीडरुपया येवढीं वाटोळीं कडेनें कातरलेलीं अशीं असतात. या झाडाला पाणी दररोज घातलें पाहिजे. हीं बारमाहा पुष्कळ फुलणारीं झाडें आहेत. फुलाचा आकार वाटोळा असून पैपेक्षां थोडा मोठा आहे. याच्या फुलांना वास नसतो. हीं फुलें दोनप्रहरीं ताठ फुलतात, म्हणून यास दुपारी असें म्हणतात. याचीं झाडें बियापासून होतात व हीं जेथें सावली फार नसेल तेथें लावावीं. यांत दोन जाति आहेत. एक तांबडी दुपारी व एक पांढरी दुपारी. दोहोंचीं पानें व फुलाचा आकारही सारखाच असतो.

**मांदार**--हें झाड रुईसारखेंच असतें व हें सुमारें तगरी येवढें वाढतें. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. पाण्या-

ची विशेष गरज नाहीं. याचीं फुलें व पानें पांढरीं असतात. फुलें दुई-च्या आकाराचीं असून थोडीं मोठीं असतात. हीं बहुतकरून बारमहा फुलतात.

**कोऱ्हांटकी**—हें लहानसें हात दोनहात उंच वाढणारें झाड आहे. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते, पाणी मात्र विशेष पाहिजे. हीं झाडें बहुतकरून बारमहा फुलतात. यांत दोनतीन जाति आहेत. पांढरी, निळी, आणि पिंवळी. पांढरीला व पिंवळीला थोडे थोडे कांटे असतात.

**धोत्रा**—हें लहानसें दोनतीन हात उंच वाढणारें झाड आहे. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते, पाणी मात्र विशेष पाहिजे. यांत चारपांच जाति आहेत. पांढरा, काळा, आणि पिंवळा. पांढऱ्यांत दोन जाति आहेत. एक एकेरी फूल येणारा व दुसरा दुहेरी फूल येणारा. तसेच काळ्यांत दोन जाति आहेत. एक एकेरी फूल येणारा व दुसरा दुहेरी फूल येणारा. पिंवळ्यांतही दोन जाति आहेत. एक एकेरी फूल येणारा व दुसरा दुहेरी फूल येणारा. याचीं बियापासून झाडें होतात. ह्याची लावण्याची कृति विशेष कठीण नाहीं.

**केशरी**—हें बरेंच मोठें वाढणारें झाड आहे. हें पाण्याच्या आश्रयास लावावें. याला कोणची माती असली तरी चालते. याला पांढरीं फुलें येतात. याला बोंडें येतात तीं फार सुरेख दिसतात. त्या बोंडांत बारीक बारीक बीं असतें. तीं पाणी घालून चोळलीं म्हणजे त्यांचा केशरासारखा रंग निघतो, त्याला थोडा वास असतो.

**केवडा**—हें मोठें फैलावणारें झाड आहे. हें कोणच्याही मातींत ओलाव्याच्या आश्रयानें लावलें म्हणजे जगतें. याला तुरा येतो, त्याला वास फार चांगला असतो. यांत दोनतीन जाति आहेत. एक पुरुष जातीचा केवडा असतो, त्यास फुलें येत नाहींत, पानें मात्र पांढरीं असतात. दुसऱ्या दोन जाति आहेत; एकीस पांढरीं फुलें येतात व एकीस पिंवळीं

फुलें येतात. यांच्या फुलास वास फार असतो म्हणून यांच्या आश्रयास नाग असतात असें म्हणतात. या झाडाच्या बुडाशीं लहान लहान दुसरीं झाडें फुटतात, तीं निराळीं करून लाविलीं असतां आणखी झाडें होतात. याच्या पानास बारीक बारीक कांटे असतात.

**बकूल**—हें मोठें होणारें फुलझाड आहे. हें लहान असतें तेव्हां पाण्याला जपलें म्हणजे झालें. याचीं फुलें बारीक असतात व यास वास फार आहे. हीं वाळलीं तरी याच्या फुलास वास असतो. याला पानें फार दाट असतात तेव्हां हें झाड फार सुशोभित दिसतें. याला सुपारी एवढीं फळें येतात तीं पिकल्यावर त्यांचा रंग पिवळा होतो व हीं फळें खातात; परंतु तीं थोडीं तुरट लागतात. हें झाड कोणच्याही जमिनींत होतें. याचें लांकूड इमारतीच्या उपयोगी पडतें.

**जुनेसिआ अशोका**—( अशोक ) याला फुलें पिवळीं असून तांबूस रंगाचीं असतात. तीं फुलें झाडांच्या मोठमोठ्या खांद्यास व खोडासही येतात. हें झाड कोणत्याही चांगल्या जमिनींत होतें. परंतु याला तांबडी माती विशेष हितकारक आहे. हीं झाडें बियापासून होतात. याला पानें लांब लांब येतात व याला कोंवळीं पानें आलीं म्हणजे हा वृक्ष फार सुरेख दिसतो. हा वृक्ष होण्यास फार दिवस लागतात. हा लहान असतो तेव्हां याला पाण्याला जपलें म्हणजे झालें.

**कदळी**—हें लहानसें फुलझाड आहे. याला पानें लहानशीं कांहींशीं केळीच्या आकाराचीं असतात. हें फुलझाड बहुतकरून बारमहा फुलतें. याला दोनतीन प्रकारचीं फुलें येतात. तांबडीं, पिवळीं, भगवीं, केशरीं वगैरे तऱ्हेतऱ्हेचीं येतात. कांहींचीं पानें तांबूस रंगाचीं असतात व कांहींचीं हिरवीं असतात. याला खालीं आल्यासारखे कंद असतात. हें कोणच्याही जमिनींत होतें. परंतु पाणी विशेष पाहिजे.

**चक्कर भेंडी**—हें एक बरेंच मोठें होणारें फुलझाड आहे. याचीं पानें कांहींशीं भेंडीसारखीं असतात. याला फुलें येतात तीं कांहींशीं नास्वंदीसा-

रखीं आहेत. सकाळीं पांढरीं असतात व तींच संध्याकाळीं गुलाबी रंगाचीं होतात. याचीं कलमें जगतात. हें लहान असतें तेव्हां याला पाण्याला जपलें म्हणजे झालें. मोठें झाल्यावर याला आठवड्यांतून एकदां पाणी द्यावें.

**सदाफुली**—हें बारमहा फुलणारें एक लहानसें फुलझाड आहे. यांत दोन जाति आहेत. एकास सफेत पांढरीं फुलें येतात, व दुसरीस गुलाबी फुलें येतात. याला बारीक बारीक शेंगा येतात. याचें बीं पाण्याच्या पाटाच्याकडेनें अगर जेथें नेहमीं ओलावा असेल तेथें टाकिलें असतां सहज उगवते. याची विशेष खबरदारी घ्यावी लागत नाहीं. याला कोणचीही जमीन असली तरी चालते.

**कदंब**—हें मोठें वाढणाऱ्या फुलझाडांपैकीं एक झाड आहे. याला काळी किंवा तांबडी कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. हें झाड होण्याला पुष्कळ दिवस लागतात. याला पांढऱ्या फुलाचे झुपके येतात. याच्या फुलाला वास असतो. याचीं झाडें बियापासून होतात व कलमापासूनही होतात. लांकूड इमारतीच्या उपयोगीं पडतें. ह्यास चैत्र वैशाखीं फुलें येतात.

**पाटली**—हें मोठें वाढणारें फुलझाड आहे. याला तांबडी अगर काळी माती असली तरी चालते, परंतु काळ्या मातींत हें झाड चांगलें होतें. याच्या फुलाचा रंग तांबूस असतो व फुलाला वास येतो. लहान असतें तेव्हां याला पाणी आठवड्यांतून दोनदां द्यावें. मोठें झालें म्हणजे यास पाण्याची विशेष गरज नाहीं. याचीं कलमें जगतात व बियापासूनही झाडें होतात.

**खुर चांफा**—हें एक मोठें होणाऱ्या फुलझाडांपैकीं आहे. याला पानें पावसाळ्यांत येतात व फुलें उन्हाळ्यांत येतात. याचीं पानें लांब असून हिरव्या रंगाचीं असतात. याला पानें असतात तेव्हां फुलें नसतात व फुलें असतात तेव्हां पानें नसतात. याचे फुलण्याचे दिवस म्हटले म्हणजे चैत्र वैशाख हे महिने आहेत. याचें फूल पांढऱ्या रंगाचें असून मध्यें थोडें पिव-

ळें असतें व याला एक प्रकारचा थोडा वास असतो. याचीं कलमें जगतात. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. लहान असतें तेव्हां याला आठवड्यांतून दोनदां पाणी द्यावें व मोठें झाल्यावर यास पाण्याची गरज नाहीं. हें झाड जुनें झालें म्हणजे याला सुमारें वीतभर लांबीची शेंग येते, ती सर्पदंशावर चालते असें म्हणतात.

**चित्रक**-हें लहान फुलझाडांपैकीं एक फुलझाड आहे. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालतें; पाणी मात्र विशेष लागतें. याला तीन प्रकारच्या रंगांचीं फुलें येतात. पांढरा, निळा व तांबडा. याच्या मुळ्या औषधी आहेत. याच्या बुडाला बारीक बारीक झाडें फुटतात, त्यापासून ज्यास्ती झाडें होतात.

**झेंडू**-मागें मेरीगोल्ड पहा.

**संकासूर**-हें बरेंच उंच वाढणारें फुलझाड आहे. यांत दोन जाति आहेत. एकास तांबूस रंगाचीं फुलें येतात व एकास पिवळ्या रंगाचीं फुलें येतात. याचा फुलण्याचा हंगाम श्रावण व भाद्रपद हे महिने आहेत. याला बोट बोट लांब शेंगा येतात. याच्या बियापासून झाडें होतात. लहान असतें तेव्हां याला आठवड्यांतून दोन वेळां पाणी द्यावें. मोठें झाल्यावर यास विशेष पाण्याची गरज नाहीं. याला कोणच्याही प्रकारची माती असली तरी चालते. हें झाड पुष्कळ दिवस राहतें.

**सायंकाळी**-याला कोठें कोठें गुलबास म्हणतात. हें संध्याकाळीं ४ वाजतां फुलतें. याला बीं येतें, तें कांहींसें काळ्या मिऱ्यासारखें असतें. याच्या फुलाचे रंग तांबडा, पिवळा, पांढरा, गुलाबी व कांहींना एका फुलांत पांच रंग असे असतात. या झाडाला खालीं कांदा असतो. याचीं बियापासून झाडें होतात.

---

## वासाच्या पानांचीं झाडें.

हीं झाडें कुंड्यांतून होण्यासारखीं आहेत. याची लागवड करणें

फारशी कठीण नाहीं. कोणत्याही जमिनींत तीं होतात, त्यांस पाणी वरचेवर देऊन जमीन ओली राखावी, म्हणजे झालें. याचा उपयोग खाण्याच्या पदार्थास वास येण्याकरितां त्यांत घालितात.

**एन्डिव्ह**--हें एक कांहींसें सालीट सारखें वाढणारें झाड आहे. याचें बीं पावसाळा संपल्यावर खतावलेल्या जाग्यांत पेरावें. हें चारसहा बोटें उंच झाल्यावर कुजलेलें खत घालून पाणी जेथें न सांचेल व ओलावा नेहमीं न राहील अशा ठिकाणीं वितीवितीच्या अंतरावर लावावें. याला एक दिवसाआड पाणी देत जावें. याच्या पानास एक प्रकारचा वास येतो.

**लेव्हेन्डर**--हें कुंड्यांत वाढणारें लहानसें वासाचें झाड आहे. याचें बीं पावसाळा लागण्याचे सुमारास अगर पावसाळा संपण्याच्या सुमारास कुंड्यांत पेरावें व त्याजवर फार थोडी बेतानें माती घालावी, आणि ती कुंडी पावसांत अगर उन्हांत ठेवूं नये आणि त्याला पाणी कुंड्याच्या कांठाबरोबर थोडें घालावें. याचें रोप आल्यावर एकेक झाड कुंड्यांत लावावें. हीं झाडें पुष्कळ दिवसपर्यंत राहतात. लेव्हेंडर म्हणून वासाचें बाजारांत पाणी मिळतें, त्यासारखाच या पानाला वास येतो व यापासूनच तें करितात. याच्या पानाचा रंग पांढुरका असतो.

**लीक**--ही कांद्यासारखीच वाढणारी एक जात आहे. याला बहुतेक कांद्यासारखा वास येतो. याचें बींही बहुतेक कांद्याच्या बियासारखेंच आहे. याचें बीं पावसाळा संपण्याच्या सुमारास कुंड्यांत पेरून रोप करितात. याला पाणी फार सोसत नाहीं, याकरितां हें टोपल्यांत अगर पेटीच्या खोक्यांत जेथें पाणी बेतानें देतां येईल तेथें लावितात. याच्या पाल्याचा उपयोग खाण्याच्या पदार्थांत निराळ्या तऱ्हेचा वास यावा म्हणून करितात.

**सेज** ( कापुरी )--याला कापुरी म्हणतात. याचें बीं पावसाळ्याच्या सुमारास कुंड्यांत पेरून रोप करितात. याचीं झाडें हात दोन हात उंच वाढतात व मोठ्या थोरल्या जाळ्या होतात. याचीं पानें बोटभर लांब व

दोन बोटें रुंद असतात पानाला थोडा पांढुरका रंग असतो. याचें जड दाबून झाडें करितात व याच्या पानाला कापुरासारखा वास येतो.

**टाईम**–हें जमिनीबरोबर वाढणारें वासाचें बारीक झाड आहे. याचें बीं ही अगदीं फार बारीक असतें. हें कुंडयांत लावतेवेळीं कुंडयाला खालीं भोंक पाडून त्यावर खापऱ्या घालून कुजलेलें खत व माती घालून तो कुंडा भरावा, उष्ण खत घालू नये आणि त्या कुंड्यांत बीं पेरावें व त्यांजवर उगीच थोडी माती घालावी अगर हें रेतीत मिसळून पेरावें आणि त्याला वरून पाणी न देतां तो कुंडा पाण्याच्या भांडयांत अर्धा बुडवावा म्हणजे खालून त्याला ओल येते, त्या ओलीने तें बीं उगवतें व तें उगवून बरेंच मोठें झालें म्हणजे पसरट कुंड्यांत एकेक दोनदोन रोपें लावावींत आणि पाणी जपून घालावें. याचीं पानें बारीक असतात. याला वास पुष्कळ असतो.

**रोजमरी**–हें लहानसें वासाचें झाड आहे. याचें बीं पावसाळा संपण्याच्या बेताला कुजलेलें खत घालून कुंड्यांत पेरावें व वर फार थोडी माती घालावी व पाणी बेतानें बीं एक ठिकाणीं जमा न होई अशा व्यवस्थेनें द्यावें व हा कुंडा फार उन्हांत ठेवूं नये व फार सावलींतही ठेवूं नये. याचें रोप चारसहा बोटें उंच झाल्यावर कुंड्यांत दोनदोन तीनतीन रोपें लावावींत आणि कधीं कधीं यास पातळ खत देत जावें.

**मार्जोरम**–हें मरव्यासारखेंच एक झाड आहे. याचें बीं पावसाळा लागण्यापूर्वीं खतावलेल्या जागेंत कुंडयांत पेरावें, हें बीं बारीक असतें म्हणून यांवर माती फार बेतानें घालावी. हें उगवून आल्यावर खत मातीचा ओटा करून त्यांजवर वितीवितीच्या अंतरानें एकेक रोप लावावें आणि पाऊस नसेल तेव्हां एकदिवसाआड पाणी देत जावें. हीं झाडें पुष्कळ दिवस टिकतात. हीं फार नाजूक नाहींत, याचें बरेंच मोठें बेट होतें, तें फोडून लाविलें असतां त्याचीं पुष्कळ झाडें होतात.

**आंसाची व्हेरबीना**–हें एक लहानसें झाड आहे. यास पांढऱ्या

फुलाचा तुरा येतो, परंतु याच्या पानास वास फार उत्तम येतो. याचीं कलमें जगतात व जड जगतात.

**आजमा**–याचें झाड लहान असतें व याचीं पानें वाटोळीं व झाड असून त्यास कांहींसा ओव्यासारखा वास येतो. हीं पानें खोकल्यावर औषधी आहेत असें म्हणतात. याचीं झाडें कलमापासून होतात. युरोपियन लोक याचा वासाकरितां स्वयंपाकांत उपयोग करितात व आपले लोक याचीं भाजी करितात. हीं झाडें कुंड्यांत चांगलीं होतात. यास फार ऊन सोसत नाहीं.

**वासाचे पानाचा गुलाब**--हा एक प्रकारचा गुलाब आहे. याच्या पानास मधुर वास येतो. याला लहान लहान गुलाबी रंगाचीं फुलें येतात. याचीं झाडें दुसऱ्या गुलाबाच्या झाडावर डोळे बांधून तयार करितां येतात. याचीं कलमें जगत नाहींत. हें झाड साधारण जमिनींत होतें. यास इतर गुलाबाप्रमाणें कांटे असतात.

**पाच**—हें पोकळ्याच्या भाजीसारखें वाढणारें लहान वासाचे पानाचें झाड आहे. हें कोणत्याही जमिनींत होतें. याला तुळशी सारखे तुरे येतात, त्याला वास असतो व याच्या पानालाही वास असतो. हें झाड नवीन लाविलें म्हणजे मुळ्या चांगल्या धरीं तोंपर्यंत रोज पाणी द्यावें, पुढें एक दिवसाआड दिलें तरी पुरे होतें. याचीं कलमें जगतात व बियापासूनही याचीं झाडें होतात.

**दवणा**–हें लहानसें वाढणारें झाड आहे. याच्या पानाला वास फार येतो. हीं झाडें कोणत्याही खतावलेल्या जमिनींत होतात. आश्विन व कार्तिक या महिन्यांत याचें बीं पेरितात, म्हणजे हीं चैत्रमासीं तयार होतात, या महिन्यांतच यांना फुलें व बीं येऊं लागतें. याचीं फुलें पिंवळीं असतात. यांना पाऊस फारसा सोसत नाहीं. हीं झाडें जेजूरी येथें तेथील लोक हमेशा तयार करितात.

**मरवा**–हें लहानसें कुंड्यांत वाढणारें झाड आहे. याच्या पानाला वा-

गला वास आहे. याला जेथें फार ऊन नाहीं व फार सावलीही नाहीं अशा ठिकाणीं ठेवावें. व याला पाणी एक दिवसाआड घालावें. हें झाड फोडून लाविलें असतां याचीं अधिक झाडें होतात. याला या देशांत बीं येत नाहीं, द्वीपांतरीं येतें.

**मरटल**–याच्या पानास वास असतो, व फुलें पांढरीं असतात. याचीं कलमें व जड जगतात. याला कोणच्याही प्रकारची माती असली तरी चालते.

**वासाचे पानांचा जरेनियम**–हें एक लहानसें झाड आहे. याचे पानास वास येतो. हें जरेनियमचे जातीपैकींच एक झाड आहे. याचीं पानें कातरलेलीं असतात व फार सुरेख दिसतात. यांत दोनतीन जाति आहेत. एकीचीं पानें फार बारीक असतात. दुसऱ्याचीं पानें काळसर असतात व वासांत थोडा फरक आहे. तिसऱ्याचीं पानें हिरवीं असतात, यांचीं कलमें जगतात. याला पाणी फार सोसत नाहीं.

**मींट ( पुदीना )** याची लागवड करणें फारच सोपी आहे, म्हणजे कलमें कोणत्याही जमिनींत लाविलीं असतां लागतात, पाण्याचा मात्र बंदोबस्त ठेविला म्हणजे झालें. याचे पानास एकप्रकारचा वास असतो. याचा उपयोग भाजीपाल्यांत वगैरे फारसा करीत नाहींत. याची चटणी करितात. खोकल्यावर याचा उपयोग करितात.

**गवती चाहा**—याचीं झाडें गवतासारखींच वाढतात आणि त्याला चांगला वास येतो. हीं झाडें पाण्याच्या पाटाजवळ किंवा जेथें ओलावा विशेष असतो अशा ठिकाणीं चांगलीं होतात. हीं झाडें निरनिराळीं करून लाविलीं असतां जगतात. याच्या पानाचा चाहासारिखा उपयोग करितात व हा औषधी आहे.

---

## वेलांचें वर्णन.

**आयव्ही**–हा वेल सुरेख हिरवागार दिसणाऱ्यापैकीं आहे. याचीं पानें कांहींशीं तोंडलीच्या पानासारखीं दिसतात. हा दगडाच्या भिंतीवर बारीक

बारीक मुळ्याच्या आधारानें चढतो, तेव्हां ती भिंत फार सुरेख दिसते. याचीं कलमें जगतात. हा थंड देशांत चांगला होतो, तसा उष्ण देशांत होत नाहीं.

**आन्टिगोनम् लेप्टोपस्**-हा एक सुंदर वेल आहे. याचीं पानें खरखरीत हिरवीं असून वाटोळीं असतात; व फुलें गुलाबी रंगाचीं असतात. याला फुलें येतात, त्याचे झुपकेचे झुपके असतात, तेव्हां तो वेल फार सुरेख दिसतो. यास फुलें बारमहा येतात. याच्या मुळ्या खोल जातात, आणि हा वेल बियापासून होतो.



**आरिस्टिलोकिया ( राघुचा वेल )** याचें बीं पावसाळा लागण्याचे पूर्वी कुंडींत पेरून तो चार बोट उंच झाल्यावर तें दुसरें ठिकाणीं बदलावें. हा वेल बारमहा राहतो आणि लवकर वाढतो. याला फुलें येतात, तीं कांहींशीं राघूसारखीं असतात. याचे जडही जगतात.

**बॉनीस्टेरिया लारिफोलिआ** या वेलाचीं पानें लांबट असून गोलाकार असतात. याचे जड जगतात, व याला फुलें पावसाळ्यांत पुष्कळ येतात.

**बम्मनशिया ग्रांडीफ्लोरा**-हा एक वेल आहे. याचीं पानें वाटोळीं असून थोडीं लांबट असतात, आणि फुलें मोठीं व पांढरीं असतात. याचे जड आणि कलमेंही जगतात. यास फुलें हिंवाळ्यांत येतात. हा वेल फार मोठा वाढणारांपैकीं आहे. फुलास थोडा एक प्रकारचा वास असतो.

**बिगनोनिआ ग्रासेलीस**-हा वेल भिंतीवर आपोआप बारीक मुळ्या फुटून त्यांच्या आधारानें चढतो. यास उन्हाळ्यांत फुलें येतात,

तीं पिंवळीं असतात; त्यांतून एक आठवडाभर तर फारच फुलें येतात. याचे जड जगतात.

**बिगनोनिआ व्हेनिष्टा**-या वेलाचीं पानें दुभागलेलीं असतात. यास तांबूस फुलांचा झुपका येतो. याला हिंवाळ्यांत पुष्कळ फुलें येतात. हा एक उत्तम फुलें येणाऱ्या वेलांपैकीं वेल आहे. याचे जड जगतात व कलमेंही जगतात. एकदां लाविला म्हणजे पुष्कळ वर्षेंपर्यंत रहातो.

**सिसस् डिस्कोलर.**—हा एक सुरेख वेलांपैकीं वेल आहे. याचीं पानें खालून तांबूस जांभळे रंगाचीं असतात, व वरच्या बाजूस हिरवीं असून पांढरीं असतात. याला गारवा असून छाया पाहिजे. याचे जड जगतात, व कलमेंही जगतात. फुलें फारच बारीक असतात.



**आयपोमिया अट्रोसरुलिया**—या वेलास हिंवाळ्यांत निळीं व पांढरीं फुलें पुष्कळ येतात. हा वेल बियापासून होतो. भोंवरीच्या फुलापेक्षां हें फूल थोडें मोठें असतें व हें नाजूक असतें.

**आयपोमिया लीरी**-हें एक वेलासारखे वाढणारें झाड आहे. याचीं फुलें गुलाबी रंगाचीं असतात. याचीं कलमें जगतात.

**कन्व्हाल्व्हलस् ( भोंवरी )** भोंवरीच्या जाति पुष्कळ आहेत;

यांस निरनिराळ्या प्रकारचीं फार सुरेख फुलें येतात. याची लावणी करणें फार सोपी आहे. याचें बीं पावसाळा लागण्याच्या अगर संपण्याच्या सुमारास पेरावें, म्हणजे भर पावसांत लावूं नये. यास वर चढण्यास काड्या लावून त्याजवर वेल चढवावेत. याला मधून मधून पातळ खत द्यावें. हा वेल फुलूं लागला म्हणजे फार सुरेख दिसतो.



**हेक्झासेंट्रोस म्हैमोरिनीम**-हा एक सुरेख वेल आहे. याचे फुलांचा रंग तांबूस व नारंगी असतो. हा वेल या दक्षिण देशांत चांगला होतो. याला फुले पावसाळ्यांत पुष्कळ येतात. याचे जड आणि कलमें जगतात.

**होवा कारनोसा**-हा वेल वाढण्यास बरेच दिवस लागतात. याचीं फुलें तांबूस रंगाचीं असतात व फुलांचे झुपकेच झुपके येतात. पान वाटोळे व लहान असून जाड असते. याची कलमें व जड जगतात. याला छायेची जागा असून गारवा असावा

**ज्याक्की मिनशा**-याचें बीं पावसाळा लागण्याचे सुमारास पूर्वी कुंडींत पेरून चारपांच पानें आलीं म्हणजे जेथें लावणें असेल तेथें लावावा. याला चार महिने नित्य फुलें पुष्कळ येतात. याचीं जडापासूनही झाडें

**लानीसेरा ज्यपोनिका ( हनीसकल )**–या वेलाचीं फुलें पांढरीं असतात, नंतर यांचा रंग पिंवळट होतो. यांस सुवास असतो. याचीं कलमें व जड जगतात. हा वेल पुष्कळ दिवस टिकतो. जेथें ओलावा असेल तेथें लाविला म्हणजे झालें.

**लानीसेरा सेंपरव्हीरीन्स**–या वेलाचीं फुलें काळसर तांबूस रंगाचीं असतात. हा वेल मोठा होत नाहीं. याचीं कलमें जगतात. याला वाढण्यास फार दिवस लागतात. याचीं पानें वाटोळीं असतात व हा पुष्कळ दिवस रहातो.

**मारेंडिया बारक्लेयाना**–हा वेल बियापासून होतो. याच्या दोन जाति आहेत. एकाला पांढरीं फुलें येतात व एकाला जांभळीं फुलें येतात. हा वेल फार बारीक आहे. याला हिंवाळ्यांत पुष्कळ फुलें येतात. याचें फूल कांहींसें गोकर्णीचे फुलासारखें आहे. याला फुलें जांभळ्या रंगाचीं येतात.

**पॅशन फ्लावर**—हा एक वेल आहे. याच्या जाति पुष्कळ आहेत. याला कोणी कोणी कमळाचा वेल म्हणतात. हा कुंड्यांत लाविला तरी होतो. याला अमुकच प्रकारची जमीन पाहिजे असें नाहीं. हा कोणत्याही जमिनींत होतो. याला पाणी विशेष लागतें. कांहीं जातीच्या पॅशन फ्लावरचीं पानें हाताच्या पंज्यासारखीं असतात, याचें पान दुसऱ्या पॅशन फ्लॉवरपेक्षां थोडें मोठें असतें. व याचे पानाचा रंग हिरवा असून थोडा काळसर असतो. ह्याचीं फुलें लाल रंगाचीं असतात. याचे जड जगतात व कलमेंही जगतात. दुसरी एक पॅशन फ्लावरची जात आहे, तिचें फूल वरील लाल फुलाच्या पॅशन फ्लॉवरपेक्षां थोडें लहान आहे. व पानाचा आकारही त्याजसारखा असून थोडें लहान असतें व याचा रंग शेंदरी असतो. दुसरी निळ्या फुलाची एक पॅशन फ्लावरची जात आहे, तिचें फूल दडस असुन त्याला मधूर वास असतो. याचें पान तांबड्या पॅशन फ्लावरच्यापेक्षां थोडें लहान असून काळसर रंगाचें असतें, फुलाचा आकार कांहींसा

वाटीसारखा असतो. हिचीच एक दुसरी जात आहे, तिच्या पानांची व फुलाची आकृति वर सांगितलेल्या शेंदरी रंगाच्या जातीसारखीच असते; परंतु हिचें फूल मात्र एकेरी निळें असतें. पांढरीं फुलें येणारी एक पॅशन फ्लावर आहे, त्यांत दोन जाति आहेत. याच्या फुलांचा आकार व रंग जवळ जवळ सारखाच असतो; परंतु एकीच्या वेलाचीं पानें हिरवीं असून आंतल्या बाजूस तांबूस व पांढरे रंगाचे ठिपके असतात. दुसरे जातीचे वेलांचीं पानें हाताचे बोटासारखीं कापलेलीं नसून मागें मोठीं व पुढें चिंचोळीं असतात. ह्या सर्व जातींला फुलें पावसाळ्यांत येतात.

**पेट्रिआ व्होल्युबिलीस**-हें एक मोठें वेलासारखें वाढणारें झाड आहे. याला फुलें निळ्या रंगाचीं येतात. तीं पावसाळ्यांत व हिंवाळ्यांत पुष्कळ येतात. याचे कलम [illegible]. याचीं पानें खरखरीत असतात. फुलें एकेक न येतां लांब लांब घोंस येतात. हें झाड पुष्कळ दिवस टिकतें.

**पाव्हरिआ**-याला तांबड्या रंगाच्या फुलांचा झुपका येतो. याचे जड जगतात व कलमेंही जगतात. याचीं पानें चारसहा बोटें लांब व दोन अडीच बोटें रुंद अशीं असतात. याला जेव्हां फुलांचा तुरा येतो, तेव्हां हा वेल फार सुरेख दिसतो.

**रांगून क्रीपर**-हा वेल पुष्कळ मोठा वाढतो. याला गुलाबी रंगाचीं पुष्कळ फुलें येतात. याचे जड व कलमेंही जगतात. हा वेल एकदां लाविला म्हणजे याची मोठी येरळी जाळी होते. याच्या फुलांच्या झुपक्यांना एक प्रकारचा थोडा वास येतो.

**स्टिफनोटिस् फ्लोरीबंडा**-हा एक सुरेख वेलांपैकीं वेल आहे. याला फुलें पांढरीं सफेत असून कांहींशीं गुळछबूसारखीं असतात. याला वास असतो. यास हिंवाळ्यांत व उन्हाळ्यांत पुष्कळ फुलें येतात. याचीं कलमें व जड जगतात.

**कामोक्लीट व्हल्ग्यारीस**-याचें बीं पावसाळा लागण्याचे सुमा-

रास जेथें वेल पाहिजे असेल तेथें पेरावें. याला हिंवाळ्यांत तांबड्या, पांढ-ऱ्या व पिवळ्या रंगांचीं फुलें पुष्कळ येतात.

**टिकोमा जास्मिनायडीस्**–हा एक मोठा वाढणारा वेल आहे. याला फुलें बहुतकरून बारमहा येतात. तीं पांढरीं असून त्यांस गुलाबी रंगाची झांक मारते. याचे जड जगतात. याला पाणी विशेष लागतें. याला जमीन कोणच्याही प्रकारची असली तरी चालते. हा वेल पुष्कळ दिवस राहतो.

**टिकोमा राडीकन्स**–हें एक वेलासारखें वाढणारें झाड आहे. याचीं कलमें जगतात. यास तांबडीं फुलें येतात. याचा आकार कांहींसा गुलछबूसारखा असतो व याचीं पानें बारीक असून थोडीं सभोंवतीं कातरलेलीं असतात.

**थंबरजिया ग्रांडीफ्लोरा**––हा एक मोठा लवकर वाढणारा वेल आहे. याला फुलें जांभळ्या रंगाचीं येतात. याचीं कलमें जगतात, व हीं झाडें बियापासूनही होतात. याचीं पानें मोठीं असतात. याला पाणी विशेष लागतें.

**थंबरजिया फ्रेग्रन्स**—हा एक बारीक नाजूक वेल आहे. हा बियापासून होतो. याला पांढरीं फुलें बारमहा येतात.

**मून क्रीपर**—याचीं फुलें पांढरीं असतात. या वेलास हीं फुलें रात्रीं येतात. हा वेल बियापासून होतो, व हें बीं पावसाळा लागण्याचे सुमारास पेरावें, म्हणजे फुलें पावसाळ्यांत व हिंवाळ्यांतही येतात. याचें बीं पांढरें असतें व पानेंही मोठीं असतात.

**गोकर्ण**—या वेलाचे फुलास दोनतीन पाकळ्या असतात. हा वेल पावसाळा संपत आला म्हणजे फुलूं लागतो. हा वेल बियापासून होतो. हीं फुलें पांढऱ्या व निळ्या रंगाचीं असतात. यांत दुसरी एक जात आहे, त्याच्या फुलाला ७ पाकळ्या असतात. याला पाणी विशेष लागतें.

**स्नेल क्रीपर**—हा एक घेवड्यासारखा वाढणारा वेल आहे; परंतु याचीं पानें घेवड्यापेक्षां लहान असून पातळ असतात व फुलें चवळी-च्या आकारासारखीं दिसतात; परंतु मोठीं असतात. या फुलाचा आकार वांकडा असतो. याला एक प्रकारचा चांगला मधूर वास असतो. हा एक-दां लावला म्हणजे पुष्कळ दिवस टिकतो. याच्या शेंगा गोकर्णीच्या शें-गांसारख्या असून थोड्या लांब असतात. याचीं झाडें बियापासून होतात, व कलमेंही जगतात.

---

## सुशोभित पानांचीं झाडें.



**पाम**—हें एक ताडाचे जातीपैकीं सुंदर झाड आहे; याच्या पानाच्या खांद्या पांचसहा फूट लांब असतात आणि पानें सुमोर फूट दोन फूट लांब असून दोन बोटें रुंद असतात. पानाचा रंग हिरवा असतो. हीं झाडें कुंड्यांत लावितात, व जमिनींत लाविलीं असतां पंधरावीस हात उंच वाढतात. लहान असतांना कुंड्यांत लाविलीं असतां तो कुंडा उ-न्हांत ठेवूं नये, व मोठीं झालीं म्हणजे जमिनींत जरी लावलीं तरी जेथें

पाणी पुष्कळ मिळेल व झाडांचा आसरा असेल तेथें लावावींत. हीं झाडें तांबड्या मातींत व काळ्या मातींतही होतात; परंतु तांबडी माती याला विशेष हितकारक आहे. हीं झाडें बियापासूनही होतात.

**सुरमाड**—हें एक फार सुरेख समोर वाढणारें झाड आहे. याला पाणी फार लागतें, व हें कोणत्याही चांगल्या जमिनींत होतें; याचे पाण्याचे पन्हळ करितात. याची साल फार मजबूत असते. याला बर्लीमाड असें म्हणतात. याला बियाचे मोठमोठे तुरे येतात तेव्हां हें झाड फार सुरेख दिसतें. याचीं पानें रुंद असून शेवटीं थोडथोडीं कातरलेलीं असतात व हीं कांहींशीं पंखासारखीं दिसतात, याच्या रसाची कोठें कोठें दारू व साखरही करितात. व याच्या खोडांतून साबूदाणेही निघतात असें म्हणतात. याच्या खांद्याशेजारीं गुंडाळलेले काळे तंतु असतात, त्याच्या दोऱ्या करितात, त्या पाण्यांत लौकर कुजत नाहींत व युरोप खंडांत रंग वगैरे लावण्याकरितां याच्या कुंचल्या करितात. याला जो तुरा येतो त्याला लहानशा सुपारी येवढालीं फळें असतात. त्याचा कोठें कोठें रानटी लोक सुपारीसारखा उपयोग करितात. हीं झाडें बियापासून होतात व हें बीं काठिण असतें, सबब हें उगवण्यास बरेच दिवस लागतात.

**साबूदाण्याचें झाड**–खऱ्या साबूदाण्याचीं झाडें इंडियन आर्कीपेलेगो या नांवाचीं बेटें आहेत त्यांमध्यें पुष्कळ आहेत, तेथील लोक ह्यांचा धान्याप्रमाणें उपयोग करितात. या झाडांच्या खोडापासून जे साबूदाणे निघतात, त्यावर तेथील लोक आपला बरेच दिवस निर्वाह करितात. साबूदाण्याचे झाडास सागूपाम असें म्हणतात. सागू हें नांव पडण्याचें कारण असें कीं, प्राचीन मलाया भाषेंत भाकरीस सेगूट असें म्हणत असत आणि ह्या झाडाच्या खोडापासून निघणाऱ्या पदार्थांवर तेथील लोक आपला उदरनिर्वाह करीत असत, म्हणून यास सेगो असें नांव पडलें आहे. हीं झाडें आपल्या देशांत अलीकडेच आलीं आहेत, हीं

झाडें खाऱ्या व ओलसर जमिनींत चांगलीं होतात, हीं झाडें सुमारें वीस-पंचवीस हात उंच वाढतात. हें झाड लहान असतें तेव्हां जणूं काय पुष्कळ अंकुराचेंच झालें आहे असें वाटतें. हें लहान असतें तेव्हां याला कांटे असतात. याचीं झाडें त्याच्याबाजूस पिलें फुटतात, त्यापासून किंवा बियापासून होतात. हें झाड सुमारें तीस वर्षेंपर्यंत टिकतें.

**सैकस**–हें एक ताडाच्या जातीपैकींच सुंदर दिसणारें झाड आहे. विशेषेंकरून जेव्हां हें झाड लहान असतें, तेव्हां तर फारच सुरेख दिसतें. हें अतिशय सावकाश वाढणारें आहे, म्हणून याची शोभा पुष्कळ वर्षेंपर्यंत जशीच्या तशीच राहते; ज्याप्रमाणें सुरमाड व इतर तशाच जातीच्या दुसऱ्या झाडांच्या बुंध्यांतून साबूदाणे निघतात, त्याप्रमाणें यांतून ही निघतात; परंतु खऱ्या साबूदाण्याचें हें झाड नव्हे. याच्या मुख्य दोन जाति आहेत. याचीं पानें बुंधा सभोंवतीं फर्नसप्रमाणें दाट येतात, त्यामुळें हें झाड शोभिवंत दिसतें. याची नवीन झाडें बुंध्याजवळ फुटलेल्या पिलांपासून तयार होतात.



**अरेलिया**–हें झाड फार सुरेख आहे. याचीं पानें मोठीं असून रुंद असतात. याच्या मुळ्यांस नवीन झाडें फुटतात. त्यापासून ज्यास्ती

झाडें करितां येतात व याचीं कलमेंही जगतात. याच्या पुष्कळ जाति आहेत. त्यांपैकीं अरेलिया पापेरीफेरा म्हणून जीएक जात आहे, त्या जातीचें झाड फारच शोभिवंत दिसतें. याचीं पानें वरील चित्रांत दाखविल्याप्रमाणें विभागलेलीं असतात. चीन देशांतील लोक याच्या खोडांतील गाभ्यापासून कागद करीत असत, म्हणून या झाडास कागदाचें झाड असें नांव पडलें आहे.

**प्रवाशाचें झाड**--याचीं पानें कांहींशीं केळीच्या पानासारखीं असून फार सुरेख दिसतात. ह्या झाडाच्या खोडापाशीं जेथें पानाचा देंठ असतो, तेथें कापलें असतां त्यांतून पिण्यास योग्य असे स्वच्छ पाणी बाहेर पडतें. जेथें उष्ण प्रदेशांत पाणी मिळत नाहीं, तेथें परमेश्वरानें हीं झाडें उत्पन्न केलीं आहेत; जेव्हां उन्हाळ्यांत जाणाऱ्या येणाऱ्या वाटसरूस पिण्यास पाणी मिळत नाहीं, तेव्हां या झाडाचें पान कापून त्यांतून निघालेल्या पाण्यावर ते आपली तहान भागवितात. ह्यावरून या झाडास प्रवाशाचें झाड हें नांव पडलें आहे. हें झाड वीसपंचवीस हात उंच वाढतें. याची सर्व आकृति केळीच्या झाडाप्रमाणेंच असते, परंतु याचीं पानें फक्त दोहों बाजूस समोरासमोर येतात. याला केळीच्या घडाप्रमाणें काळ्या रंगाच्या फळांचा घड येतो, परंतु तीं कोणी खात नाहींत, पानें वर येत चाललीं म्हणजे खालचा भाग नारळाच्या खोडासारखा कांहीं दिसतो व हें झाड कोणच्याही जमिनींत होतें.

**राजहंस**—ही एक फर्न्सची जात आहे, याला इंग्रजींत मेडन्हेअर फर्न्स असें म्हणतात. हें झाड सुमारें वीतभर उंच वाढतें. याचीं पानें चवलीएवढीं रुंद असून कातरलेलीं असतात. याला तांबडी माती चांगली मानवते. याला पाणी दिवसांतून दोनदां तरी मिळालें पाहिजे. हीं झाडें ओह्याच्या कडेला व विहिरीच्या बाजूला व नेहमीं पाणी पडतें अशा ठिकाणीं पुष्कळ उगवतात. याला ऊन फार सोसत नाहीं. हीं लहान कुंड्यांत लाविलीं असतां हिरवीगार फार सुरेख दिसतात. याच्या पाल्याचा औषधाकडेही कधीं कधीं उपयोग करितात.



**इरान्थिमम् नरव्हम्**-हें एक सुरेख लहानसें झाड आहे. याचीं पानें मोठीं असून काळसर हिरव्या रंगाचीं असतात. याच्या दोनतीन जाति आहेत. याला अस्मानी रंगाचीं बारीक फुलें येतात. याचीं झाडें कलमापासून होतात. याला जमीन खतावलेली असावी.

**चवेणी**-हें एक केळीच्या जातीपैकींच झाड आहे. याचीं झाडें डोंगराळ प्रदेशांत व कोठेंही लाविलीं असतां चांगलीं होतात. हीं झाडें बागेंत लाविलीं असतां फार सुरेख दिसतात. हीं झाडें पावसाळा लागण्याचे सुमारास आपोआप फुटूं लागतात, व आश्विन व कार्तिक या महिन्यांत आपोआप मरतात व पाणी दिलें तरी त्यास पानें वगैरे येत नाहींत, कांदे मात्र जसेच्या तसेच राहतात. ह्या झाडास केळीप्रमाणें घड येतो; परंतु त्याच्या फळांत बिया फार असतात, त्या बियांचा रंग काळसर असतो. हीं झाडें बियापासून पुष्कळ होतात. याच्या सोपटाच्या तंतूपासून दोऱ्या तयार करितात.

**सुरू**-हें एक सुरेख समोर वाढणारें झाड आहे. याच्या जाति पुष्कळ आहेत, एकाच्या फांद्या लांबलांब पसरतात, दुसरी एक जात आहे त्या जातीचीं झाडें गोल असून सरळ वाढतात. तिसरीच्या खांद्या खालीं लोंबत राहतात. अशा याच्या जाति अनेक आहेत. त्या सर्वांचीं

झाडें कलमापासून व जडापासून तयार होतात. कांहीं जातींचीं झाडें बियापासून होतात. या झाडास इंग्रजींत सायप्रस् असें म्हणतात. हें झाड पूर्वी सायप्रस् बेटांतून युरोपांत नेलें, सबब याला सायप्रस् असें नांव पडलें आहे. याला कोणत्याही प्रकारची माती असली तरी चालते, परंतु पाणी मात्र वेळचे वेळीं द्यावें लागतें.

**आरुकेरिआ (सुरूची जात)**—याच्या जाति पुष्कळ आहेत. त्यांचीं नांवें, कनिंघामी, एकसेलसा, बिडूविली, इ० जाति आहेत. हे सुरू मजल्यामजल्यानें वाढतात. हे कोणत्याही चांगल्या जमिनींत होतात, यास पाणी वेळचेवेळीं दिलें म्हणजे झालें. यांच्या कांहीं जातीला कांटे असतात.

**बांबू**-हें उंच वाढणारें एक झाड आहे, याच्या जाति पुष्कळ आहेत; हीं झाडें बियापासून होतात व याच्या बुडापाशीं बारीक बारीक मोड फुटतात, ते निराळे करून लाविले असतां झाडें होतात; याला बीं सुमारें साठ वर्षांनीं येतें असें म्हणतात व तें बीं गव्हासारखें खाण्याच्या उपयोगांत आणितात. हीं झाडें नवीन लाविलीं असतां पाऊस नसेल तेव्हां पाणी द्यावें, पुढें याला पाण्याची गरज नाहीं. याचे उपयोग अनेक आहेत.

**ग्रीव्हेलिआ रोबस्टा**-हें एक समोर वाढणारें सुरेख झाड आहे. याचीं पानें कातरलेलीं असतात. याला पिवळट रंगाचे फुलांचे तुरे येतात. याचें बीं फार पातळ कागदासारखें असतें, हें लावते वेळेस यावर माती वगैरे फार थोडी घातली पाहिजे. हें कोणत्याही चांगल्या जमिनींत होतें. हीं झाडें बियापासून होतात.

**अकालिफा**—हें झाड लवकर वाढतें, याचीं पानें तांबडीं असून काळसर असतात, व कांहींशीं सभोंवतीं कातरल्यासारखीं असतात. हें कोणत्याही चांगल्या जमिनींत होतें. यास पाणी पुष्कळ पाहिजे. याचीं कलमें जगतात. यांत दोनचार जाति आहेत. कांहींचीं पानें हिरवट असतात, कांहींचीं पिंगट रंगाचीं असतात. हीं बगीच्यामध्यें सडकेच्या बाजूनें लाविलीं असतां फार सुरेख दिसतात.



**मरांटा**-याच्या जाति पुष्कळ आहेत. या झाडाची आकृति कांहींशी कर्दळीसारखी असते. परंतु पानाचा रंग तांबडा व जांभळा असतो. यास पाणी पुष्कळ लागतें. हें कोणत्याही चांगल्या जमिनींत होतें. यास सावली पाहिजे. याच्या झाडाला बुडाशीं लहान लहान झाडें फुटतात, यापासून जास्ती झाडें करितां येतात.

**डिफनबेकिया**-हें एक लहानसें सावलींत वाढणारें झाड आहे. याचीं पानें मोठीं असून पानाला पांढरे, काळे, हिरवे पट्टे असतात. हें कुंड्यांत होतें. याच्या मुळाला लहान लहान झाडें फुटतात, तीं निराळीं करून लाविलीं असतां पुष्कळ झाडें होतात, अगर याचीं कलमें जगतात. याच्या दोनतीन जाति आहेत, कांहींचीं पानें लहान असतात, त्यास काळे, पांढरे असे पट्टे असतात व कांहींचीं पानें फार मोठीं असतात, त्यांस हिरवे आणि पांढरे पट्टे असतात. याला पाणी विशेष लागतें. हें झाड कुंड्यांत सुरेख दिसतें. याला लाल फळांचे झुपके येतात. याला कोणच्याही प्रकारची माती असली तरी चालते.



**फर्न्स**—( पेरण ) हें झाड पाण्याचा आश्रयास वाढणारें आहे. याच्या जाति पुष्कळ आहेत. हें सावलींत ठेवून पाणी पुष्कळ घातलें म्हणजे हिरवेगार राहतें. यांपैकीं कित्येकाच्या पाठी पांढऱ्या असतात, त्यास "रूपेरीपेरण" म्हणतात. कित्येकाचीं पानें बारीक असून जांभळी झांक मारते. त्यास "लायकोपोडीयम" म्हणतात; व कित्येकाच्या पाठी पिंवळ्या असतात, त्यास "सोनेरीपेरण" म्हणतात. याचे कोंब दुभागून लाविले असतां जगतात. कित्येकांच्या पानाच्या मागें बीं असतें, तें ओलाव्याच्या जमिनींत पेरलें म्हणजे उगवूं लागतें, आणि झाडें होतात. दुसरी एक पेरण आहे त्याला पालिएनसीस म्हणतात. त्याचीं पानें कोंबडयाच्या पंखासारखीं दिसतात. दुसरी एक एडीयांटम म्हणून फर्न्सची जात आहे, त्याचें झाड हात दीडहात उंच वाढतें, व पानें राजहंसापेक्षां मोठीं असतात. अशा याच्या पुष्कळ जाति आहेत. या सर्व जातींना पुष्कळ पाणी, तांबूस माती व सावली व थोडें ऊन असें लागतें. यांत ट्रीफर्न्स म्हणून एक फर्न्स आहे.

तें चांगलें पुरुषभर उंच वाढतें. याला पानें दोनदोन हात लांब फुटतात. याला सावली पाहिजे व पाणी विशेष पाहिजे. दुसऱ्या कांहीं पेरणी आहेत, त्या पावसाळ्यांत मात्र डोंगरांत उगवतात, पुढें पावसाळा संपल्यावर मरतात.

**गटारिआ लॉंजी फोलिआ** ( अशोक )-हें झाड समोर वाढणारें आहे. यास वाढण्यास पुष्कळ दिवस लागतात; व याचीं पानें हिरवींगार असल्यामुळें हें फार सुशोभित दिसतें. हें कोणच्याही चांगल्या जमिनींत होते. हीं झाडें बियापासून होतात. याला बीं लहानशा सुपारीएवढें येतें, याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते; लहान असतें तेव्हां याला पाण्याला संभाळलें म्हणजे झालें. मोठेपणीं यास पाण्याची विशेष जरूर नाहीं.



**पॉईन्सेटिया**—हें एक लहानसें सुरेख झाड आहे. याला हिंवाळ्यांत व उन्हाळ्यांत तांबडीं पानें येतात. दुसरी एक जात आहे, त्यास सफेत पांढरीं पानें येतात. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते, परंतु पाणी विशेष पाहिजे. याचीं कलमें जगतात.

**कोडचा**-हें झाड पुष्कळ ठिकाणीं नजरेस पडतें. याचीं पानें हिरवट रंगाचीं असून वरती पांढरे डाग असतात. हें झाड कुंड्यांत होतें

व जमिनींत खतावलेल्या जाग्यांत लाविलें असतां चांगलें होतें. याला पाणी विशेष लागतें. हें झाड सुमारें तीनचार हात उंच वाढतें. यांत दोनतीन जाति आहेत. कांहींचीं पानें पांढुरकीं असून पुढें चिंचोळीं असतात व कांहींचीं पानें तांबूस रंगाचीं असून वर ठिपके असतात. याचीं कलमें जगतात.

**कोलीस**–हें लहान कुंडयांत वाढणारें झाड आहे. याच्यामध्यें पुष्कळ जाति आहेत. कांहींचीं पानें तांबडीं असतात. कांहींचीं हिरवीं असून त्यावर तांबडे डाग असतात, कांहींचीं पानें वर पांढरीं असून त्यावर तांबडे डाग असतात. अशा याच्या जाति अनेक आहेत. हें झाड फार दिवस टिकत नाहीं. पावसामध्यें हें झाड चांगलें होतें व तें उन्हाळ्यांत राखण्याचें कठिण आहे, म्हणजे पावसाळा संपल्यावर याचीं वरचीं वरचीं कोंवळीं कलमें घेऊन खालचें झाड फेंकून द्यावें. पुनः दोन महिन्यांनीं वरचीं कोंवळीं कोंवळीं कलमें घेऊन खालचें झाड टाकून द्यावें; असें न केल्यास तें झाड सर्व मरून जाईल व बियाणें नाहींसें होईल. हीं कलमें पावसाळ्याच्या चार महिन्यांत चांगलीं होतात.



**फिटोनिआ**–हें झाड कांहींसें वेलासारखें कुंडयांत वाढतें. याच्या पानाच्या शिरा पांढऱ्या असतात. यास छाया पाहिजे. याचीं कलमें

जगतात. याच्या पानावर तांबड्या रेघा असतात. यामध्यें दुसरी एक जात आहे, तिचीं पानें तांबूस रंगाचीं असतात व रेघा वगैरे वरच्यासारख्याच असतात. याला फार पाणी सोसत नाहीं व फार ऊन सोसत नाहीं. याला कोणच्याही प्रकारची माती असली तरी चालते, परंतु तांबड्या मातींत हीं चांगलीं होतात.



**ड्रसेना**—हें एक समोर वाढणारें झाड आहे. याचे पानांचे रंग निरनिराळे असतात, व ते ऋतुपरत्वें बदलतात. यास सावली असावी. याचीं कलमें जगतात. यांत पुष्कळ जाति आहेत. एकाचीं पानें

केवड्यासारखीं पांढरीं येतात व एकाचीं तांबडीं असतात व एकाचीं पानें हिरवीं असून लाल रेघा असतात व कांहींचीं पानें काळसर असतात. एका जातीला तर आंत हिरवे असून बाहेरून रेशीमकाठी धोतरासारखे कांठ असतात; अशा याच्या अनेक जाति आहेत. हें झाड लौकर वाढत नाहीं.

**एक्सकेरिआ बायकोलर**--हें झाड थोडेच ठिकाणीं आढळतें. याचीं पानें वरून हिरवीं, व मागचे बाजूस तांबडीं असतात. यास बारीक फुलें येतात. याचीं कलमें जगतात. हें झाड सुमारें दोनतीन हात उंच वाढतें. हें कुंडयांत होतें व खतावलेल्या जमिनींतही होतें. यास पाणी विशेष पाहिजे.

**क्रोटन्स** ( लाडणी )--या देशांत या झाडास लाडणी म्हणतात. हीं झाडें या देशांत आस्ट्रेलिया देशांतून नवीनच आणलीं आहेत. याला कधीं कधीं बारीक पांढरीं फुलें येतात, परंतु याच्या पानांचा रंग व आकृति फार सुरेख असून त्यावर नानाप्रकारचे रंग येतात. याचीं कलमें जगतात. हीं फार कडक उन्हांत ठेवूं नयेत. यास समुद्रकिनारची हवा विशेष मानवते. यास फार छायाही उपयोगाची नाहीं. हें झाड कुंडयांत होतें, त्यांत माती व चांगलें कोणतेंही कुजलेलें खत घालून लावावींत. यास पाणी विशेष पाहिजे. यास आठवडयांतून एक वेळ पातळ खत द्यावें. याच्या जाति पुष्कळ आहेत त्यांचीं नांवें:—

**ग्रॅंडी**—याचें पान फणसाच्या पानासारखें असून थोडें लांब असतें, व त्याच्या शिरा तांबूस असतात.

**इंपेरीआलीस**—याचें पान दोनपासून अडीच अंगुलांपर्यंत रुंद असतें. याच्या पानाच्या मधील रेघ तांबडी असते. हें पान कांहीं सर्पाच्या फणीसारखें असतें.

**लॉंजीफोलिआ**—याचें पान सुमारें दीड अंगुलें रुंद असून दीड किंवा पावणेदोन हात लांब असतें; याच्या पानाचा रंग काळसर असतो.

**मोरीआनस**—याचें पान वीत किंवा दीड वीत लांब असतें, व दोन अंगुळें रुंद असतें. याच्या पानाचा रंग पिंवळा असून मध्यें हिरवे ठिपके असतात.

**मेकाफियाना**—याचें पान चार पांच अंगुळें रुंद असतें, व लांब सुमारें वीतभर असतें. याच्या पानाचा भाग कांहीं हिरवा व कांहीं पिंवळा असतो.

**रेक्स**—याचें पान दोन अडीच अंगुळें रुंद असतें, व लांब सुमारें सवा वीत असतें. याच्या शिरा तांबड्या असतात, व पानाचा रंगही तांबूस असतो.

**स्पायरालीस**—याचें पान काळें असतें व लांब सुमारें एक वीत असतें. पानाची आकृति स्क्रूसारखी पिळदार असते.

**सन्सेट**—याचें पान दोनपासून अडीच अंगुळें रुंद असतें, व वीत दीड वीत लांब असतें; याचा रंग तांबडा असतो.

**व्हाल्कुटस्**—याच्या पानाचा रंग पिंवळा असतो, व याचीं पानें वांकडीं देटाकडे वळलेलीं असतात.

**यंगाय**—याचें पान वीत दीड वीत लांब असतें. पानाचा रंग हिरवा असून मध्यें मध्यें निळे व तांबडे पट्टे असतात. याचें पान दोन अडीच अंगुळें रुंद असतें.

**लोआय**—याचें पान तीनचार अंगुळें रुंद असतें, व लांब वीत दीडवीत असतें. याचा रंग हिरवा असून मध्यें पिंवळे व तांबडे डाग असतात.

**ट्रायलोबस म्याक्युलेटं कोटेनी**—याचें पान सुमारें टीचभर लांब असतें, व रुंद तीन साडेतीन बोटें असतें. याची आकृति त्रिकोनासारखी असते, व मधून मधून पिंवळे ठिपके असतात.

**आंगास्टिफोलिआ जायजांटिका**—याचें पान पिंवळें असतें, व वीत दीडवीत लांब असतें, व दोनपासून अडीच अंगुलांपर्यंत रुंद असतें.

**आरिया म्याक्युलेटा**–याचें पान कोंकंबाच्या पानासारखें असून पिंवळें असतें, व त्याजवर बारीक बारीक हिरवे ठिपके असतात.

**इरेग्युलारीस**–याचें पान देंठाशीं रुंद असून पुढें बारीक असतें. याच्या पानाच्या रेघा पिंवळ्या असतात.

**मल्टीकोलर**–याचें पान वीतभर लांब असतें. याचा रंग पिंवळा असतो; व पानाची आकृति देंठाशीं व शेंड्याशीं रुंद असून मध्यें चिंचोळी असते.

**रोटेंडीफोलीयम्**–याचें पान वाटोळें असून पिंवळट रंगाचें असतें.

**म्याकझीमम्**–याचें पान वर सांगितलेल्या मेकाफियानासारखें असतें, परंतु याच्या शिरा पिंवळ्या रंगाच्या असतात.

**ट्रायलोबस लार्डक्रेनेंस**–याच्या पानाच्या शिरा तांबड्या असतात. पानास थोडी लाल झांक मारते, हें पान त्रिशूळासारखें असतें. त्यांतून मधला भाग थोडा लांब असतो.

**ट्रायलोबस डीझरालीस**–याचें पान वर सांगितलेल्या ट्रायलोबस म्याक्युलेटं कोटेनी याच्यासारखें असतें. याच्या पानांचा रंग बहुतेक पिंवळा असतो, व त्यांवर डाग वगैरे नसतात.

**व्हेरिआबिलीस**–याचीं पानें वीतभर लांब असून दोन बोटें रुंद असतात, व पानाच्या मागच्या बाजूस तांबड्या रेघा व वरती पांढरे मळके डाग असतात.

**व्हीचाय**–याचीं पानें वीत सव्वावीत लांब असतात, आणि दोन-अडीच बोटें रुंद असतात. पानाच्या मागच्या बाजूस तांबड्या रेघा असतात. पुढच्या बाजूस पांढरे मळके डाग असतात.

**कारन्युटम**–याचें पान सुमारें आठ अंगुलें लांब असतें, व रुंद अंगूल दीड अंगूल असतें. याच्या मधील रेघा व पानाची कडा पिंवळी असते, व मध्यें मध्यें पिंवळे ठिपके असतात.

**इंटरप्टम्**–याचीं पानें वीत दीड वीत लांब असतात, व रुंद

अंगूळभर असतात, पानांत हीं पानें मध्यें मध्यें तुटलेलीं असतात, म्हण- जे मधील शीर मात्र असते. याचीं पानें तांबूस रंगाचीं असतात.

**जक्सोनाय**-याचीं पानें सुमारें दोन बोटें रुंद असून वीत दीड वीत लांब असतात, व याच्या मधील भाग बहुतकरून तांबडा असतो.

**म्यागनीफोलिआ**-याचें पान कांहींसें आंब्याच्या पानासारखें असतें, परंतु मधून मधून पिंवळट असून रुंद असतें.

**माक्युलेटम्**-याचे पान " म्यागनीफोलिया " प्रमाणेंच असतें, परंतु पान पातळ असून त्यावर पिंवळे ठिपके असतात.

**ऑंडु लेटम**-याचें पान सुमारें वीतभर लांब असतें, व रुंद तीन साडे तीन बोटें असतें. याचा रंग तांबडा असून मध्यें पिंवळे डाग असतात. हें झाड फार सुरेख दिसतें.

**वाईजमीनी किंवा प्रासेलीस**—याचीं पानें वीतभर लांब व दोनपासून अडीच अंगुळेंपर्यंत रुंद असतात. मधून मधून कांहीं भाग हिरवा असतो, व बाकींचा सर्व पिंवळा असतो.

**वापटिस्टा**—याचीं पानें वीतभर लांब असतात, व चारपांच बोटें रुंद असतात. याच्या पानाचा रंग तांबडा असतो.

या शिवाय शेंकडों जाति आहेत, त्यांपैकीं थोड्याशा जातींचें वर्णन दिलें आहे.

**आलोकेशिया मेटालिका**—ही एक आळवासारखी वाढणारी जात आहे. क्यालेडियमपेक्षां ह्याचीं पानें लहान असून दडस असतात. ह्याचा पाना- चा रंग तांब्याच्या पत्र्यासारखा असून चकाकतो. ह्याच्या कांद्यास विशेष दुसरे कांदे फुटत नाहींत. वर्षांतून एकादा फुटतो. हें झाड बारमहा राहतें. ह्यास पाणी विशेष लागतें, व ह्यास ऊन फार सोसत नाहीं.



**क्यालेडियम्** ( आळवाची जात आहे )-याचीं पानें चमत्कारिक रंगाचीं असतात. याचें पाणी पावसाळा संपल्यावर थोडें थोडें कमी करावें, व पावसाळा लागण्याचे सुमारास सुरू करावें, कोंब आल्यावर कुंड्यांत बदलावेत. यास पावसाळ्यांत मधून मधून शेणाचें पातळ खत द्यावें. कांहीं जातींचीं पानें सफेत पांढरीं असून शिरा मात्र तांबड्या असतात. कांहींचीं पानें मध्यें लाल असतात. कांहींचीं पानें हिरवीं असून मध्यें तांबडे ठिपके असतात. अशा ह्याच्या पुष्कळ जाति आहेत. हीं झाडें

फार उन्हांत ठेवूं नयेत. ह्यांस बारीक बारीक दुसरे पुष्कळ कांदे फुटतात, त्यांपासून नवीन झाडें करितां येतात.



**बिगोनिया**-हें एक सुशोभित झाड आहे. याच्या पुष्कळ जाति आहेत. त्या सर्वांस पाणी पुष्कळ लागतें. याचीं कलमापासून झाडें होतात. यास सावलीची जागा लागते. ह्याच्या पानाचे तुकडे लावून नवीन झाडें होतात, व हे तुकडे रेतींत लावावे लागतात; व ह्याच्या बुडास दुसरीं लहान लहान झाडें फुटतात, त्यापासून हीं नवीन झाडें तयार होतात. ह्याचीं पानें फार नाजूक असतात. कांहीं जातींना तांबडीं, पांढरीं वगैरे तऱ्हेतऱ्हेचीं फुलें येतात. ह्याला फार ऊन सोसत नाहीं. ह्याला पाणी विशेष लागतें, परंतु फार झाल्यास हीं झाडें मरतात. कांहीं जाति दोनदोन वितीपर्यंत उंच वाढतात, व कांहीं कुंड्याबरोबर वाढतात.

**पेपेरमिका**-हें एक लहानसें कुंड्यांत वाढणारें झाड आहे. त्याचीं पानें वाटोळीं असून हाताच्या तळव्याएवढीं मोठीं असतात. ह्या पानाचा रंग हिरवा असून त्यावर पांढऱ्या रेघा असतात. ह्या झाडाचीं पानें तोडून रेतींत लाविलीं असतां नवीन झाडें तयार होतात. ह्याला फार ऊन सोसत नाहीं. ह्यास पाणी विशेष लागतें, परंतु फार झाल्यास हीं झाडें मरतात.

ह्याच्या बुडाजवळ फुटलेल्या झाडांपासून नवीन झाडें तयार करितां येतात. हीं झाडें बारमहा रहातात.

**ह्याफ्मेनिया**-हें दोन अडीच हात वाढणारें झाड आहे. ह्याचीं पानें वीत सवावीत लांब असून चारसहा बोटें रुंद असतात. ह्याच्या पानांचा रंग तांबूस असतो. ह्याला फार ऊन सोसत नाहीं, परंतु पाणी फार झालें तर मरतात. ह्याची दुसरी एक जात आहे, त्याचींही पानें तेवढींच मोठीं असून वर पांढऱ्या रेघा असतात. ह्या झाडास तीनचार बोटांचे अंतरावर पेरे असतात, तीं राखून त्याचे तुकडे पाडून ते लाविले असतां जगतात. हीं झाडें फार दिवस टिकत नाहींत, म्हणून वरचेवर कलमांपासून तयार करावीं लागतात.

**मेंदी**-हें झाड बरेंच उंच वाढतें. ह्याला पांढरीं फुलें येतात व त्यांस किंचित् वास असतो. ह्याला पानें वगैरे आलीं म्हणजे हें झाड फार सुरेख दिसतें. ह्याला पाणी विशेष लागतें. ह्याचीं कलमें जगतात. ह्याचीं पानें कांहींशीं कंवठीच्या पानासारखीं असतात, व ह्या पाल्याचा लाल रंग होतो. ह्याला थोडे थोडे कांटे असतात, म्हणून ह्याचा कधीं कधीं कुंपणाकडे उपयोग करितात.

**प्यानॅक्स**—याचीं पानें हिरवीं असून तीन पाकळ्या असतात. याच्या दोनतीन जाति आहेत. एकाचीं पानें हिरवीं असून वाटोळीं असतात, व दुसऱ्याचीं पानें बारीक असून कातरलेलीं असतात. हीं कोणत्याही चांगल्या जमिनींत होतात. याचीं कलमें जगतात. ह्याचीं पानें कांहींशीं फडुलिंबाच्या पानांसारखीं असतात. ह्याला पाणी विशेष लागतें. ह्याला कोंवळा पाला आला म्हणजे हें झाड फार सुरेख दिसतें.

---

## मोठे वाढणारे वृक्ष.

**गुलमोहोर**-हें झाड चांगल्या जमिनींत लवकर वाढतें. हें लहान असतें, तेव्हां पाण्याचा वगैरे बंदोबस्त ठेवावा लागतो. ह्याला उन्हाळ्यांत तांबड्या रंगाच्या फुलाचे तुरे येतात व त्या

वेळेस ह्या झाडावर पानें नसतात म्हणून हें झाड लांबून फारच शोभिवंत दिसतें. ह्याला हात दीड हात लांब शेंगा येतात. त्यांतील बियांपासून झाडें होतात. परंतु त्या बिया फार कठिण असल्यामुळें हें बीं लावण्याचे पूर्वी ऊन पाण्यांतून काढून नंतर लावावें लागतें, म्हणजे त्यापासून झाडें लवकर तयार होतात, नाहीं तर वर्षभर सुद्धां तें बीं उगवत नाहीं. ह्या झाडाच्या सावलीखालीं दुसरीं झाडें चांगलीं होत नाहींत. ह्याचें लांकूड फार ठिसूळ असतें, म्हणून इमारतीच्या वगैरे उपयोगी नाहीं. हें झाड कलमापासूनही तयार होतें.

**पतंग**—हें एक सुरेख झाड आहे. हें कोणत्याही चांगल्या जमिनींत होतें; व हीं झाडें बियांपासून होतात. ह्या झाडास थोडे कांटे असतात. ह्याला शेंगा येतात, तेव्हां हें झाड फार सुरेख दिसतें. ह्याला पिवळट रंगाचीं बारीक फुलें येतात. ह्याचें लांकूड लाल असतें. तें कुटून त्याचा अर्क काढून कोणच्याही पिठास तो रंग देतात व त्यापासून गुलाल तयार होतो. लहान असतें तेव्हां पाण्यास विशेष जपावें लागतें, मोठें झाल्यावर पाण्याची जरूर नाहीं.

**देवदार**—ह्यास पुनई असें दुसरें नांव आहे. हें झाड उंच वाढतें. ह्याचीं पानें एकासमोर एक अशीं वाढतात. ह्याच्या पानांचे दांडे लांब असतात व ह्याचीं पानें कातरल्यासारखीं असतात. ह्याच्या फुलांस वाईट वास असतो. ह्याचीं नवीन झाडें बियापासून होतात. हें झाड मध्ये फांद्या फुटल्याशिवाय सरळ नीट वाढतें म्हणून हें जहाजावरील डोलकाठीच्या उपयोगी पडतें. खऱ्या देवदारांच्या झाडांचीं पानें लहान असतात व हीं झाडें हिमालय पर्वतावर आहेत.

**बहावा**—हें मोठें वाढणारें झाड आहे. हें कोणच्याही जमिनींत होतें. लहान असतें तेव्हां यास पाण्याला जपलें म्हणजे झालें, मोठें झाल्यावर यास पाण्याची जरूर नाहीं. ह्याला पिवळीं फुलें पुष्कळ येतात, तेव्हां हें झाड फार सुरेख दिसतें. याला हात दीड हात लांब शेंगा येतात, त्या

थाढोळ्या असतात, त्याचा मगज मोठा औषधी आहे. त्याचा काढा करून घेतात, त्यापासून सौम्य रेच होतो. यांत लहानशा पावटया एवढ्या पांढऱ्या बिया असतात. त्यापासून नवीन झाडें तयार होतात. याचा पालाही औषधी आहे. याचें लांकूड मजबूत असल्यामुळें इमारतीच्या उपयोगीं पडतें. हें बहुतकरून सरळ नीट वाढतें.

**दिवीदिवी**–हें एक लहानसें वाढणारें झाड आहे. हें झाड कोणच्याही जमिनींत होतें. हें लहान असतें तेव्हां याला पाण्याला जपलें म्हणजे झालें, मोठेपणीं याला पाण्याची गरज नाहीं. याला कांटे बरेच असतात, यामुळें हें कुंपणाच्या बाजूला लावण्याला उपयोगी पडतें. याला फुलें कांहींशीं बाभळीच्या आकाराचीं येतात, परंतु तीं पांढुरकीं असतात व पानें लहान असतात, त्याचा आकार काहींसा आपट्याच्या पानासारखा असतो. याला वांकड्या शेंगा येतात, त्यांत बीं बारीक असून वर मगज बराच जाडी असतो. याच्या शेंगांपासून कातडीं रंगवितात व त्या युरोपखंडांत फार महाग विकल्या जातात. एका मोठ्याशा झाडाच्या वर्षांत पंचवीसतीस शेर शेंगा सांपडतात, म्हणजे एक झाडाच्या शेंगाची किंमत सुमारें पंचवीसपासून तीस रुपयेपर्यंत होते, इतक्या महाग विकतात. हीं झाडें बियापासून होतात व हीं लावल्यापासून तिसऱ्या वर्षीं यास थोडथोड्या शेंगा येऊं लागतात.

**कासोद**–हें मोठें वाढणारें झाड आहे. ह्याला पिवळ्या फुलांचे झुबके येतात, त्यामुळें हें झाड फार शोभिवंत दिसतें. ह्याच्या शेंगा चपटया असतात, त्यांत काळ्या बिया असतात त्यापासून नवीन झाडें तयार होतात. हें कोणच्याही जमिनींत होतें. लहान असतें तेव्हां पाण्याविषयीं जपलें म्हणजे झालें, मोठें झाल्यावर पाण्याची जरूर नाहीं. हें फार लौकर वाढणाऱ्या झाडांपैकीं आहे. याचीं पानें कांहींशीं शेवग्यासारखीं असतात, परंतु थोडीं मोठीं असतात. लांकूड फार ढिसूळ आहे व तें इमारतीच्या उपयोगीं नाहीं व हें फार वर्षें राहत नाहीं.

**रबराचें झाड**–हें झाड वडाच्या जातीपैकींच आहे. ह्याचीं पानें सुमारें वीत दीड वीत लांब असून सातआठ बोटें रुंद असतात. ह्याचीं पानें वडापेक्षां दडस असतात व तीं चकाकतात ह्यामुळें फार सुरेख दिसतात. ह्या झाडाच्या चिकापासून रबर होतो, म्हणून यास रबराचें झाड असें म्हणतात. ह्या झाडाचीं पानें नवीन फुटूं लागलीं म्हणजे त्यांचा रंग तांबूस असतो, परंतु जेव्हां तीं जून होतात तेव्हां अगदीं हिरवीं होतात. ह्याचीं नवीन झाडें जडापासून होतात व याचीं कलमेंही जगतात. हें झाड कोणच्याही जमिनींत होतें.

**पुत्रवंती**-हें एक मोठें वाढणारें झाड आहे. ह्याचें झाड नेहमीं हिरवें राहतें व त्यामुळें हें फार सुरेख दिसतें. याचीं पानें चंदनाच्या पानांच्या आकाराचीं पण त्यापेक्षा मोठीं असतात. याचीं फुलें बारीक पिवळीं असतात, आणि फळें कांहींशीं चंदनाच्या फळांसारखींच असतात. हीं झाडें फार सावकाश वाढणाऱ्यांपैकीं आहेत. हीं झाडें दुरून अशोकाच्या झाडासारखीं दिसतात. नवीन झाडें बियापासून होतात. हें कोणत्याही चांगल्या जमिनींत होतें. लहान असतें तेव्हां पाणी दिलें म्हणजे झालें. मोठें झाल्यावर ह्यास पाण्याची जरूर नाहीं. हें झाड विशेष इमारतीच्या उपयोगीं पडत नाहीं. याच्या बियांच्या माळा गळ्यांत घालण्याकरितां करितात.

**मिलिंगटोनिआ** ( कवड्या लिंब )-हें झाड समोर उंच वाढतें. याला पावसाळ्यांत व हिंवाळ्यांत पुष्कळ पांढरीं फुलें येतात. त्यांला थोडा वास असतो. याच्या मुळ्यांना झाडें फुटतात. हें झाड कोणच्याही जमिनींत होतें. याला कोणी कोणी बुचाचें झाड म्हणतात. परंतु खरीं बुचाचीं झाडें हीं नव्हेत. हीं लहान असतात तेव्हां याला पाण्याविषयीं तपलें म्हणजे झालें. मोठेपणीं यास पाण्याची विशेष गरज नाहीं. याचें लांकूड कठिण असतें, परंतु मजबूत इमारतीच्या उपयोगीं नाहीं. याला

या देशांत फारसें बीं येत नाहीं. दक्षिण अमेरिकेंत यास बीं येतें, तें पातळ पानासारखें असतें. त्यापासून झाडें होतात.

**हिरडा**—हें झाड बदामाच्या जातीपैकींच आहे. ह्यास फुलें उन्हाळ्यांत येतात. ह्याचीं फळें रंगाकडे व औषधाकडे उपयोगीं पडतात. हें झाड सुरेख दिसतें. नवीन झाडें बियापासून होतात. याला लहान असतें तेव्हा पाण्याविषयीं जपलें म्हणजे झालें. मोठेपणीं यास पाण्याची गरज नाहीं. हीं काळ्या मातीपेक्षां तांबड्या मातींत चांगलीं होतात. हीं झाडें उत्पन्नाचीं आहेत, म्हणजे चांगलेंसें मोठें झाड असलें तर त्यास दहा बारा रुपयाचे हिरडे सांपडतात.

**बेहेडा**—हें झाड बरेंच उंच वाढतें. ह्याच्या फुलांस वाईट वास येतो. ह्याचीं फळ गोल असून खाण्यास तुरट असतात. ह्याच्या फळांतील बीं गोड असतं, तीं खातात. हीं फळें औषधीं आहेत. ह्याचीं नवीन झाडें बियापासून होतात. हें झाड तांबड्या जमिनींत चांगलें होतें. ह्या झाडास लहानपणीं पाणी विशेष लागतें, मोठेपणीं ह्यास पाणी लागत नाहीं. याच्या फळाची साल खोकल्यावर उपयोगी पडते.

**सावरीण**—हें फार मोठें वाढणारें झाड आहे. ह्याचीं पानें कांहींशीं चिकूच्या पानांएवढीं असून थोडीं मोठीं असतात. ह्याचीं पानें हिरवीं असून हें झाड मजल्यामजल्यानें वाढतें व त्यामुळें फार सुरेख दिसतें. ह्याचीं फुलें पांढरीं असतात व शेंगा हादग्यासारख्या लांब असून बारीक व वाटोळ्या असतात व हात दीडहात लांब असतात, त्यांत कापसासारखें हलकें बीं असतें व तें सांपडण्याचें फार कठीण पडतें. ह्याच्या सालीचा काढा करून घेतला असतां त्यापासून हिंवताप जातो असें म्हणतात. हीं झाडें तांबड्या जमिनींत चांगलीं होतात. नवीन झाडें बियापासून होतात. ह्यास लहानपणीं पाण्याविषयीं जपावें, मोठें झाल्यावर ह्यास पाण्याची विशेष जरूर नाहीं. याचें लांकूड मजबूत इमारतीच्या उपयोगीं नाहीं.

**पारकिनसोनिया**—हें एक लहानसें वाढणारें झाड आहे. याला

पिवळीं फुलें येतात. हें कोणत्याही चांगल्या जमिनींत होतें, हें झाड बियापासून होतें. याला कांटे असतात म्हणून हें कुंपणास लावण्याच्या उपयोगीं पडतें. याला शेंगा कांहींशा चवळीच्या शेंगांसारख्या येतात. याचें लाकूड ठिसूळ आहे, इमारतीच्या उपयोगी नाहीं.

**खडशेरणी**—हें झाड सुरूसारखें समोर वाढतें. याचें लांकूड हलकें असून मजबूत असतें. हें कोणत्याही जमिनींत होतें; परंतु वाळवंटांत चांगलें होतें. हें झाड बियापासून होतें. लहान असतें तेव्हां याला पाण्याला जपलें म्हणजे झालें. मोठेपणीं यास पाण्याची गरज नाहीं. याचे कोळसे कणखर पडतात. लोहारकामाला याच्या कोळशाचा पुष्कळ उपयोग करितात. हीं झाडें बागेंत लावून याच्या वाढ्या कातरीनें कापून मजलेदार करितात, तेव्हां तीं फार सुरेख दिसतात.

**होडोनिया बरमेनियाना**—(जखमेचें झाड). हें एक लहानसें सुरेख वाढणारें झाड आहे. हें बहुतकरून बारमहा हिरवेंगार दिसतें. याच्या पाल्यापासून जखम लवकर बरी होते, म्हणून याला जखमेचें झाड असें म्हणतात. याचें लांकूड फार मजबूत व जड आहे. या लांकडाच्या मुठी किंकऱ्यांना वगैरे उपयोगी पडतात. याचीं पानें कांहींशीं केवड्याच्या पानासारखीं आहेत. याला फुलें पांढरीं येतात. हीं झाडें पाण्याच्या आश्रयानें लाविलीं असतां चांगलीं होतात. हीं झाडें बियापासून होतात.

**गोरखचिंच**-हें झाड खडकाळ व रेताळ जमिनींत चांगलें होतें. याचें खोड फार मोठें असतें; व पानें उन्हाळ्यांत सर्व गळतात. हें झाड पुष्कळ वर्षेंपर्यंत टिकतें. हें झाड फार उंच वाढतें. ह्याला पानें इतकीं असतात कीं, ह्यामुळें ह्या झाडाचें बहुतेक खोड झांकून जातें. ह्या झाडाचे खोडास एके प्रकारचा रोग होतो, तणेंकरून हीं झाडें मरतात. ह्याचीं फुलें पांढरीं असून मोठीं असतात. ह्याचीं फळें लहानशा नारळाएवढीं असतात. ह्या फळांत स्वादिष्ट व किंचित् आंबट असा गीर असतो तो खातात. याच्या रसाचें साखर घालून सरबत करितात, तें तापावर व पित्तावर औ-

षधी आहे. ह्याच्या खोडाचे सालीचे तंतू फार मजबूत असतात. ह्याचीं नवीन झाडें बियापासून होतात. हें कोणच्याही जमिनींत चांगलें होतें. हें झाड मोठें होई तोंपर्यंत पाण्यास जपावें म्हणजे झालें, मग पाण्याची जरूर नाहीं.

**डालबरजीयासिसू**-( सिसवीची जात. ) हें झाड कोणत्याही चांगल्या जमिनींत लवकर होतें. हें तोडल्यापासून त्याच्या मुळ्यांना पुष्कळ झाडें फुटतात. हें झाड बियापासून होतें, व जड काढून लाविलें असतां होतें. याचीं पानें वाटोळीं दोन पैशा येवढालीं रुंद असतात. हीं झाडें बागाइतांत जेथें नेहमीं ओलावा असेल तेथें लाविलीं असतां फार लवकर वाढतात. हें झाड बारमहा हिरवेंगार दिसतें. याचें लांकूड फार मजबूत इमारतीच्या चांगलें उपयोगी आहे.

**माहागनी**—हें एक सुरेख समोर वाढणारें झाड आहे याचें लांकूड फार मालजम्न आहे. याला बीं येण्यास पुष्कळ वर्षें लागतात. हें झाड कोणत्याही चांगल्या जमिनींत होतें, हें लहान असतें तेव्हां याचा पाण्याचा बंदोबस्त ठेविला म्हणजे झालें. ह्याच्या लांकडाचे पातळ पानासारखे तक्ते काढून पेटावरून लावतात व ते घोटतात, व तेणेंकरून त्यांत रूप दिसतें. ह्यामुळें हें झाड सोन्यारुप्याच्या मोलानें विकलें जातें; याचीं पानें कांहींशीं चंदनासारखीं असतात. हें उशीरा वाढणारें झाड आहे.

**बिगनोनिआ पेयॉयडी.**—हें एक झाड आहे. याचीं पानें मोठीं असून कातरलेलीं असतात. याला फुलें पिंवळ्या रंगाचीं येतात. व याची शेंग हात दीडहात लांब असून तरवारी सारखी दिसते, व चार बोटें रुंद असते, आणि आंतील बीं कागदाप्रमाणें पातळ असतें. हें कोणत्याही जमिनींत होतें. खास काळी माती विशेष हितकारक आहे. हीं बागाइतांत जेथें पाण्याचा ओलावा असतो तेथें लाविलीं असतां चांगलीं होतात. याचें लांकूड विशेष उपयोगीं पडण्यासारखें नाहीं. हीं झाडें बियापासून होतात.

**सोलेनम आरबेरियम**—हें एक लहानसें कांटेरी झाड आहे. याला निळया रंगाचीं पुष्कळ फुलें येतात, व पुढें तीं पांढरीं होतात. याचीं पानें वांग्याच्या पानासारखीं असतात आणि त्याला तीक्ष्ण कांटे असतात. याला फळें येतात, तीं वांग्यासारखींच असतात. हीं झाडें बियापासून होतात. हीं फळें विषकारक आहेत. या झाडाला फुलें येऊं लागलीं म्हणजे हें फुलांनीं गच्च भरून जातें, तेव्हां हें फार सुरेख दिसतें. याचें लांकूड जाळण्याच्या उपयोगा खेरीज कांहीं कामाचें नाहीं. याला पाणी विशेष लागतें. याच्या झाडाच्या पानाला व अंगाला कांटे असतात. तो कांटा लागला असतां जखम लवकर बरी होत नाहीं.

**युकॅलिप्टीस ग्लाबुलस** ( निळीगोंद ). हे झाड समोर उंच वाढतें. याच्या पानास एक प्रकारचा वास येतो. हीं झाडें आसपास पुष्कळ असल्यापासून हिंवताप कमी होतो असें म्हणतात. हीं झाडें बियापासून होतात. याचीं पानें दोन बोटांएवढीं रुंद असून तीनचार बोटें लांब असतात व पानाचा रंग थोडा पांढुरका असतो. हीं झाडें पाण्याच्या आश्रयाला लाविलीं असतां चांगलीं होतात. याचीं पानें खाल्लीं असतां हिंवताप जातो असें म्हणतात.

**सिड्रिला तुना**—हें मोठें उंच वाढणारें झाड आहे. याचीं पानें चिंचेसारखीं बारीक असतात व याला वाटोळीं फळें येतात, त्यांत पातळ कागदासारखें बीं असतें, त्यापासून झाड होतात. हें कोणच्याही मातींत होतें. लहान असतें तेव्हां याला पाण्याला जपलें म्हणजे झालें. मोठेपणीं यास पाण्याची गरज नाहीं. याचें लांकूड मजबूत इमारतीच्या उपयोगी नाहीं. या झाडाला नवीन खांद्या फुटल्या म्हणजे फार सुरेख दिसतें.

**उंडीण**—हें झाड मोठा वृक्ष होणारें आहे. जेथें फार थंडी पडते तेथें हें झाड चांगलें होत नाहीं. समुद्राकिनारीं व तांबडया मातींत हीं झाडें चांगलीं होतात. याचें लांकूड इमारतीच्या उपयोगीं पडतें. याचे तक्ते वगैरे जहाजाच्या कामीं लावितात. याचीं पानें टीचभर लांब असून

सातआठ बोटें रुंद असतात व पानें फार गुळगुळीत असतात त्यावर कागदासारखें लिहितां येतें. याचीं फुलें पांढरीं असून त्यांना फार चांगला वास येतो. यांना फळें पुष्कळ येतात त्यास उंडये म्हणतात. हीं फळें पिकलीं म्हणजे पिंवळट रंगाचीं होतात तेव्हां त्याच्यावरची साल गुळचट असते व त्यामधील गीर लहानशा सुपारी एवढा सांपडतो. त्याचें तेल काढितात. तें दिव्याला जाळण्याच्या उपयोगीं पडतें, खाण्याच्या उपयोगीं नाहीं. पेंडीचा उपयोग खताऐवजीं करितात. तें तेल फार थंड आहे. चांगलें मोठें जुनें झाड असलें म्हणजे याला ९।१० रुपयांचीं उंडयें सांपडतात.

**आईन**—हें एक मोठें होणारें झाड आहे. याचीं झाडें बियापासून होतात. याचीं पानें वीतभर लांब असून चारसहा बोटें रुंद असतात. हीं झाडें कोणच्याही जमिनींत होतात. याला कोंवळीं पानें येतात तेव्हां हें फार सुरेख दिसतें. याला बीं मोठ्याशा सुपारीयेवढें येऊन त्याला चारपांच धारा असतात. याचें लांकूड मजबूत इमारतीच्या उपयोगीं पडतें. हें झाड लौकर वाढणारें नाहीं.

**बाभूळ**—हें एक मोठें काळ्यामातींत होणारें झाड आहे. याचें लांकूड मजबूत आहे. यांत दोनतीन जाति आहेत. एक रामकाटी म्हणून बाभूळ असते ती समोर सुरूसारखी वाढणारी आहे. दुसरी वेडीबाभूळ म्हणून आहे तिला कांटे कमी असतात, परंतु हिचें लांकूड व रामकाटीचें लांकूड साध्या बाभळीसारखें मजबूत नाहीं. याच्या शेंगा व पाला मेंढरांना विशेष आवडतो. याचे फुलास थोडा वास असतो. याच्या लागवडीकरितां विशेष खटपट करणें नको. बीं पावसाळा लागण्याच्यापूर्वीं पेरलें म्हणजे झालें.

**भेंडी**—हें एक मोठा वृक्ष होणारांपैकीं झाड आहे. याला कोणी पारस पिंपळ असें म्हणतात. याचीं पानें कांहींशीं पिंपळासारखीं असतात. याला मोठीं पिंवळीं फुलें येतात. याचें लांकूड मजबूत असून चिव-

ट असतें. हें झाड तांबड्या मातींत अगर काळ्या मातींत चांगलें होतें. त्याला फळें येतात तीं चांगलीं मोठ्याशा सुपारी एवढालीं असतात व त्यांत तीनचार बिया असतात, त्यापासून झाडें होतात. हें झाड लौकर वाढणारें आहे. मनुष्याच्या तोंडास वांग म्हणजे काळसर डाग असतात ते या भेंडीच्या पानाचा चीक लाविला असतां जातात असें म्हणतात. हें लहान असतें तेव्हां याला पाण्याला जपलें म्हणजे झालें.

**चंदन**-हें एक मोठें वाढणारें झाड आहे. हें झाड तांबड्या मातींत अगर काळ्या मातींत चांगलें होतें; परंतु काळी माती यास विशेष मानवते. याला काळीं फळें पुष्कळ येतात, तेव्हां हें फार सुरेख दिसतें. हीं फळें फोडून आंतील बीं खातात, त्यास चंदनचारोळ्या म्हणतात. याचीं झाडें बियापासून होतात. हें झाड मोठें होण्यास बरींच वर्षें लागतात. याचें लांकूड मजबूत आहे, याला उत्तम वास येतो. याचे तुकडे पाडून गंध लावण्यास खोड करितात व याच्या जून लांकडाचा भुगा करून त्याचें चंदनीअत्तर काढितात. तें फार महाग विकतें. कोणी कोणी श्रीमंत लोक याच्या पेटया करितात. हें लांकूड फार मौल्यवान आहे. हें लहान असतें तेव्हां याला पाण्याला जपलें म्हणजे झालें, मोठेपणीं यास पाण्याची गरज नाहीं.

**करंज**-हें मोठें वाढणारें झाड आहे. हें कोणच्याही जमिनींत होतें. याची लागवड करण्यास विशेष खबरदारी घ्यावी लागत नाहीं. पावसाच्या तोंडीं बिया लावून दिल्या म्हणजे झालें. याला शेंगा चापट येतात व आंत बीं पैशा येवढें जाडी असतें. याचें तेल निघतें तें खरजेच्या वगैरे औषधी आहे. याचें लांकूड चांगले इमारतीचे उपयोगी नाहीं. हें झाड लौकर वाढतें.

**कांटेसायरी**-हें एक समोर वाढणारें झाड आहे. हें कोणच्याही जमिनींत होतें. याचें बीं पाण्याच्या आसऱ्याला लावून दिलें म्हणजे झालें. हें झाड लौकर वाढतें, याला तांबडीं मोठीं फुलें येतात व फुलें मावळल्यावर त्यास मोठ्याशा सुपारी एवढालीं बोंडें येतात, त्यांत बारीक बीं असतें त्यापासून झाडें होतात. त्यांत कापूस असतो तो साधारण कापसापेक्षां

मऊ असतो. त्याच्या श्रीमंत लोक गाद्या गिरद्या करितात. याचें लांकूड हलकें असतें व तें फार मजबूत नसतें, परंतु हें लांकूड पाण्यांत लौकर कुजत नाहीं, सबब शेतांतून पाणी बाहेर जाण्याकरितां याचे नळ करितात. यांत पांढरी सायरी म्हणून एक जात आहे, तिचीं फुलें पांढरीं असतात व त्यास कांटे नसतात. हिची साल व मुळ्या फार पौष्टिक आहेत.

**कुचला**–हें मोठे वृक्ष होणारें झाड आहे. हें तांबड्या मातींत डोंगराळ जमिनींत होतें. हीं झाडें बियापासून होतात. याचीं पानें नागवेलीच्या पानायेवढीं असून त्यासारखींच काहींशीं दिसतात. याला पेरू येवढालीं फळें येतात तीं फार लाल असतात. त्या फळांमध्यें पैशाच्या आकारासारख्या दोनचार बिया असतात, त्यामध्यें मगज असतो तो कडू असतो व बिया विषकारक असतात. याचीं पानें व साल सर्व कडू आहे. याचीं पानें कधीं कधीं जनावराच्या पोटांत जातात तेव्हां तें जनावर मरतें. झाड होण्याला पुष्कळ दिवस लागतात व हें लांकूड चांगलें मजबूत असतें. ह्या झाडाला जेव्हां फळें येतात तेव्हां हें झाड फार सुरेख दिसतें. ह्या झाडाला बार येतो त्यामध्यें एखादें फळ गोड असतें असें म्हणतात म्हणून हीं फळें कावळे नेहमीं टोंचीत असतात. कुचल्याच्या बिया औषधी आहेत.

**पिंपळ**—हें मोठें होणाऱ्यापैकीं एक झाड आहे. हें कोणच्याही जमिनींत होतें. याचीं फळें कावळ्यानें खाऊन त्याच्या विष्टेपासून झाडें होतात असें म्हणतात, परंतु याचीं फळें आणून त्याचें बीं कुंड्यांत पेरिलें असतां पुष्कळ झाडें होतात. हें झाड लहान असतें तेव्हां याला पाण्याला जपलें म्हणजे झालें. याच्या मुळ्या फार लांब जातात. याचीं पानें वाटोळीं असतात. तीं गुरें खातात. ह्याचें लांकूड लांकडावर घांसलें म्हणजे विस्तव लौकर पडतो. हें लांकूड इमारतीच्या उपयोगीं नाहीं. फार ठिसूळ आहे. हिंदुलोक याला पूज्य मानितात. यांतच एक पिंपळाची जात आहे त्याच्या कोंवळ्या खांद्यांना चीक येतो, त्याला पिंपळाची लाख असें म्हणतात. त्याचा रंग तांबडा असतो.

**पांगारा**—हें बागाइतांत सहज होणारें झाड आहे. हें ओलावा असेल तेथें याच्या बिया लावल्या म्हणजे झालें. हें फार लौकर वाढतें. हें तोडलें तरी मुळापाशीं फुटून आणखी झाडें होतात. यांना तांबड्याफुलाचे घोंस फार सुरेख येतात. यामध्यें पुष्कळ जाति आहेत. एकाचीं फुलें पांढरीं असतात, एकाचीं तर पानें लहान असतात व याला फुलाचे घोंस लांब लांब येऊन फुलें लांबोडीं असतात. एक पांगारा आहे त्याचीं पानें बहुतेक पांढरींच आहेत. याचें लांकूड हलकें असतें व इमारतीस उपयोगीं नाहीं, परंतु पाण्यांत लौकर कुजत नाहीं. याचीं पानें सुरेख व याला वीत वीत लांब शेंगा येतात, त्यांत घेवड्यासारख्या जाडी लांबोळ्या बिया असतात.

**पळस**—हा मोठा वाढणारा वृक्ष आहे. याला पानें येतात तीं वाटोळीं असून सातआठ बोटें रुंद असतात, त्या पानाचा देंठ लांब असून पुढें तीन पानें असतात. हीं झाडें चैत्र वैशाखीं फुलांनीं अगदीं लाल होतात. याच्या फुलाचा रंग करितात. हें झाड तांबड्या व काळ्या मातींत होतें, परंतु तांबडी माती यास विशेष मानवते. याला शेंगा चारपांच बोटें लांब व बोट दीडबोट रुंद अशा येतात, त्यामध्यें करंजासारखें बीं असतें त्यापासून झाडें होतात. याचीं पानें जेवणाच्या उपयोगी पडतात. हिंदुलोकांत हें झाड पवित्र मानिलें आहे. याचें लांकूड मजबूत व चिवट असतें.

**रिटा**—हें मोठें सुशोभित झाड आहे. याला जेव्हां नवीन पाला येतो तेव्हां हें फार सुरेख दिसतें. हें झाड कोणच्याही जमिनींत होतें. लहान असतें तेव्हां याला पाण्याला जपलें म्हणजे झालें. मोठेपणीं यास पाण्याची गरज नाहीं. याला फळाचे घोंसचे घोंस येतात आणि ते पिकले म्हणजे पिंवळे होतात. त्या फळाची वरची साल साबणाऐवजीं कपडे वगैरे साफ करण्याकडे त्याचा उपयोग करितात. आंत काळी वाटोळी बीं असते त्यापासून झाडें होतात. याचें लांकूड मजबूत आहे. ह्या झाडाला पाणी मिळत असलें तर हें लौकर वाढतें.

**सागवान**—हें झाड समुद्राकिनारीं व डोंगरांत चांगलें होतें. याचीं पानें फार मोठीं असतात. याचीं पानें हातावर चोळलीं असतां हात रक्तासारखे लाल होतात. याच्या पानांनीं घरें वगैरे शाकारितात. हीं पानें लौकर कुजत नाहींत. याचें लांकूड फार मजबूत व पाण्यांत न कुजणारें आहे. यांत मलबारी सागवान ह्मणून एक जात आहे त्याचें लांकूड फार-च उत्तम आहे. त्याचें लांकूड पेट्या, कपाटें वगैरे करण्याच्या कामीं लावितात. याला बियाचे घोंसचे घोंस येतात त्यापासून झाडें होतात. हें बीं लौकर उगवत नाहीं. याच्या वरची कवटी फार कठीण आहे, सबब हें पेरण्याच्या पूर्वीं थोडें भाजावें लागतें. काळ्या मातींत हीं झाडें होतात परंतु वर लिहिलेल्या जमिनी सारखीं मोठीं होत नाहींत. हीं झाडें होण्याला बरेच दिवस लागतात. याच्या झाडाखालीं आपोआप रोपें उगवतात, परंतु तीं रोपें ताज्या बियाची नव्हत. वर्षास पाणी खाऊन अशीं जीं जुनें झालीं असतात तीं उगवतात.

**सिरस**—हें झाड मोठें होतें, याचीं फुलें पांढरीं असतात व यांना सुवास असतो; याच्या शेंगा तपकिरी रंगाच्या असतात. हें झाड साधारण कोणत्याही जमिनींत होतें. पहिल्यानें लहानपणीं पाणी द्यावें लागतें, पुढें पाण्याची गरज नाहीं. हें झाड बियापासून होतें. याचीं पानें चिंचेच्या पानासारखीं कांहींशीं असतात. हें झाड लौकर वाढतें. लांकूड फार मजबूत नसतें.

**वड**—हें एक मोठें होणारें झाड आहे. याचीं झाडें बियापासून होतात व कलमें लावूनही होतात. याला फळें येतात तेव्हां हें झाड फार सुरेख दिसतें. याचीं पानें जेवण्याच्या उपयोगीं पडतात. हीं झाडें बहुतकरून सडकेच्या बाजूनें छायेकारितां लावितात. यामध्यें स्त्री व पुरुष अशा दोन जाति आहेत. स्त्रीजातीच्या झाडाला मुळ्या फुटतात, त्यांस पारंब्या म्हणतात, त्या औषधाला उपयोगी पडतात व त्या जमिनीला टेंकल्या म्हणजे तें झाड पुढें वाढतें. मागील भाग तोडला तरी तें मरत

नाहीं त्याला वडी म्हणतात. व वडाला म्हणजे पुरुष जातीला अशा मुळ्या फुटत नाहींत. याचें लांकूड इमारतीच्या उपयोगीं नाहीं.

**उंबर**--हें एक मोठें वाढणारें झाड आहे. याचीं झाडें बियापासून होतात. याची लागवड करण्याची विशेष खटपट नाहीं. कोठेंही ओलाव्याच्या जागेवर बीं पेरिलें म्हणजे झाडें आपोआप उगवतात. याला अंजिराएवढालीं फळें येतात व तीं अंजिरासारखीं कांहींशीं लागतात. सोमल वगैरे कोणी खाल्ला असल्यास याच्या पाल्याच्या रसानें उतरतो असें म्हणतात. हें झाड हिंदुलोकांत पवित्र मानिलें आहे व हें झाड रानांत जेथें असतें त्याच्या शेजारीं पाणी जवळ असण्याचा संभव आहे अशी समजूत आहे. कोयता वगैरे नवीन हत्यार केलें असतां तें त्या झाडाच्या खोडास रात्रभर मारून ठेविलें म्हणजे त्या हत्याराची धार चांगली राहते असें म्हणतात. याच्या कोंवळ्या फळाची भाजी करितात. याचें लांकूड मजबूत असतें.

---

## फळझाडें.

**अननस**-हें झाड सुमारें एक हात पासून दोन हात सुमारें वाढतें. याचीं पानें केतकीच्यासारखीं असून थोडीं तांबूस रंगाचीं असतात. हें झाड लावल्यापासून तिसऱ्या वर्षीं यास फळें येऊं लागतात. ह्याला मुळापाशीं लहान लहान झाडें फुटतात तीं दुसऱ्या ठिकाणीं लाविलीं असतां जगतात व त्यापासून पुष्कळ झाडें होतात. याला तांबूस माती पाहिजे व पाण्याचा गारठा सदोदित असावा. याचें फळ वीत दीडवीत लांब असतें. याच्या फळावर तांबडे हिरवे असे खवले असतात. व या फळाच्या मध्यावर लहानसें झाडही होतें व तें मोडून लाविलें असतां जगतें. हे फळ पिकल्यावर कांहींसा पिकलेल्या फणसासारखा वास येतो. हें पिकल्यावर खाण्यास मधूर आहे. परंतु थोडीशी खाज असते व हें पित्तनाशक आहे. ह्याचा मोरंबा करून पित्तावर घेण्यास लोक उपयोग करितात.

**आक्रूड**–हें झाड फारसें आपल्या देशांत आढळत नाहीं व थंड देशांत याची लागवड विशेष दृष्टीस पडते. हें झाड कोणच्याही जमिनींत होतें. ह्याला फळें येण्याला पुष्कळ दिवस लागतात. परंतु आजानें लाविलें म्हणजे नातूनें फळें खावींत असें बुकांतून कोठें कोठें लिहिलेलें आढळतें तें खोटें आहे. ह्याला फळें पंधरासोळा वर्षांनीं येतात. याचीं फळें पिकलीं म्हणजे पेरू एवढालीं होतात. हें झाड मोठें होतें. याचीं पानें कांहींशीं भेंडीच्या पानासारखीं हिरवीगार दिसतात. ह्याला विशेष पाण्याची गरज आहे असें नाहीं. हें झाड लहान असतें त्या वेळेस पाण्याला जपलें म्हणजे झालें.

**काजू**–हें झाड कोंकणप्रांतीं खडकाळ जमिनींत होतें. याला विशेष पाण्याची गरज नाहीं. काळ्या मातींत व विशेष जेथें पाण्याचा ओलावा राहतो तेथें लावूं नये. खडकाळ अथवा जेथें पाणी घातलें असतां किंवा पावसाचें पाणी पडलें असतां लागलीच जमीन कोरडी होते अशा ठिकाणीं लावावें. हें झाड मोठें होतें. याचीं पानें कांहींशीं चाराच्या पानासारखीं दिसतात. याला कार्तिक व मार्गशीर्ष या महिन्यांत आंब्यासारखा मोहोर येतो व याचीं फळें चैत्रवैशाखांत तयार होऊन पिकूं लागतात. याचे बोंडाचा रंग कांहींचा पिवळा असतो. कांहींचा तांबडा असतो. वर बोंड व खालीं बी असें फळ झाडास लोंबत असलेलें फार सुरेख दिसतें. याचीं बोंडें खाण्यास गोड लागतात. परंतु यापासून खोकला उत्पन्न होतो. काजूच्या बिया फार गोड व स्वादिष्ट लागतात. कोंकणप्रांतीं कांहीं ठिकाणीं याच्या कोंवळ्या बियांची भाजीही करितात.

**कंवठ**–हें झाड फार मोठें होतें. हें वाढण्यास बरेच दिवस लागतात. याचीं पानें बारीक असून फार सुशोभित दिसतात. याला जमीन कोणचीही ओलाव्याची असली तरी चालते, परंतु काळी जमीन याला विशेष मानवते. याचीं फळें वाटोळीं असून पांढुरक्या रंगाचीं असतात. परंतु हें खाण्यास आंबट असतें; यांत गूळ किंवा साखर घालून लोणचें करितात,

हें पित्तनाशक आहे. पित्तानें अंगावर गांधी उठल्या असतां याच्या पा-ल्याचा रस लाविला म्हणजे त्या नाहींशा होतात.

**कंबक**-हें झाड मोठें वाढतें. याचीं पानें चिंचेसारखीं असून थोडीशीं मोठीं असतात. हें झाड कोणच्याही जमिनींत होतें, परंतु तांबडी माती विशेष मानवते. याला फळें येण्यास नऊदहा वर्षे लागतात. याचें फळ सु-मारें चारसहा बोटें लांब असतें व त्याला चार धारा असतात व हें खा-ण्यास आंबट आहे. हें पिकल्यावर पिंवळें होतें व खाते वेळेस चुन्याचें बोट लावून खाल्लें असतां आंबूसपणा कमी होतो. याचें लोणचें होतें.

**कोकंब**-हें झाड मोठें होतें. याचीं पानें चंदनाच्या पानासारखीं कांहीं-शीं असून थोडीं मोठीं असतात. हें झाड तांबड्या मातींत चांगलें होतें व याला पाणी विशेष लागतें. हें झाड लावल्यापासून सातआठ वर्षांनीं त्यास फळें येतात. याचीं फळें पेरूएवढालीं असतात. कोंवळीं अ-सतात तेव्हां हिरवीं असतात व पिकलीं म्हणजे तांबडीं होतात. हीं बहु-तकरून चैत्र व वैशाख या महिन्यांत पिकतात. याचीं पानें आंबट असतात. गरीब लोक या पानाची शिजवून कढी वगैरे करितात. हें फळ पिक-ल्यावर याचें पन्हें फार उत्तम होतें. याच्या बियाचें तेल काढितात व सालें वाळवून ठेवितात, त्याचें सार करितात. हें सार दुखणाईत मनुष्यास फार उपयोगी पडतें, व हें पित्तनाशक आहे.

**काळें मिरीं**-हा वेल आहे, याची लागवड नागवेलीच्या वेलासारखी-च आहे. याचीं पानें नागवेलीच्या पानासारखीं दिसतात, परंतु थोडीं जाड असतात. या वेलाला फार ऊन सोसत नाहीं, याला नेहमीं गारठा पा-हिजे व हा वेल तांबड्या मातींत चांगला होतो. या वेलास दुसऱ्या तिस-ऱ्या वर्षी मिऱ्यें येऊं लागतात. तीं कोंवळीं असतात तेव्हां हिरवीं दिसतात, व पिकल्यावर पिंवळीं होतात. हा वेल फळें पिकल्यावर फार सुरेख दिसतो.

**केळ**-हें झाड लावल्यापासून चांगली जमीन असली तर दहाअक-

रा महिन्यांनीं केळीं येऊं लागतात. याला कोणत्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. केळीमध्यें पुष्कळ जाति आहेत. मुठेली—याचें केळ मोठें असून याची साल फार पातळ असते व हें केळ रुचीस चांगलें लागतें. तांबडी—याचें केळ तांबडें असून मोठें असतें. व ह्या केळीचीं पानें व दांडारा तांबडा असतो व केळ रुचीस चांगलें असून सुरेख दिसतें.

**राजाळी**–याचें केळ सर्व केळाचे जातींत लांब असतें. हिचीं केळीं पिकून सुकीकेळीं करतात. ही केळ दांडगी असून उंच वाढते. व ह्याला लोंगरही मोठा येतो.

**बसराई**–ही केळ सर्व केळींत ठेंगणी असते. केळें साधारण असून रुचीस चांगलें असतें.

**म्हसराई**–हिचें केळ बसराई सारखेंच असून थोडें मोठें असतें व झाडही उंच होतें.

**सोनकेळ**–याचें केळ सर्व केळांत लहान असून लोंगरास केळीं फार येतात व रुचीस गोड असतें व साल पातळ असते.

**करंजेळी**–याचें केळ सोनकेळीच्या केळाप्रमाणेंच असतें, परंतु साल थोडी जाडी असून केळ लांब असतें. या केळी उंच वाढून याजला वाऱ्यानें मोडण्याची भीति असते.

**कोसंबी**–ही केळ उंच वाढते. हिचीं पानें दडस असतात. हिजला केळीं थोडीं येतात व केळाची साल जाडी असते.

**वेलची**–हिचें केळ लहान असून पिकल्यावर केळास वेलचीसारखा वास येतो.

**बनकेळ**–हिचें केळ मोठें असून तीन शिरा असतात व साल सर्व केळांत जाड असते. हें केळ पथ्यकर आहे.

**नारशिंगी**–( हिलाच हिरवे सालीची केळ म्हणतात ) हिचें केळ

मोठे असून पिकलें तरी हिरवेंच दिसतें, परंतु हें विशेष गोड असतें. या केळासारखीं दुसरीं केळीं गोड नाहींत व हें फार थंड आहे.

**गोवेगिरी**-ह्याचें फेळ बनकेळीसारखें असतें, परंतु साल जाडील कमी असते.

**खिरणी**-हें झाड फार मोठें होतें. याचीं पानें कांहींशीं बकुळीच्या पानासारखीं असतात. ह्या झाडाला सतराअठरा वर्षांनीं फळें येतात. ह्याला कोणत्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. हें लहान आहे तोंपर्यंत याला पाण्याला जपलें पाहिजे, मोठें झाल्यावर याजला पाण्याची विशेष जरूर नाहीं. याचीं फळें पिकल्यावर पिंवळीं होतात, व त्यांचा आकार कांहींसा निंबोळ्यासारखा असतो. तीं फळें उन्हाळ्या दिवसांत पिकतात. व खाण्यास गोड लागतात.

**गुलाबी जांब**-हें झाड सुमारें पेरूच्या झाडाएवढें वाढतें. याला लावल्यापासून तिसऱ्या वर्षीं फळें येऊं लागतात. याचीं पानें हिरवीगार असून पानाचा आकार कांहींसा जांभळीच्या पानासारखा असतो. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते, परंतु विशेषेंकरून तांबडे मातींत हें झाड चांगलें होतें. याला बहुतकरून फळें बारमहा असतात. परंतु यांचा विशेष हंगाम चैत्र व वैशाख हे महिने होत. याचें फळ वाटोळें असून लहानशा पेरूएवढें असतें, पिकल्यावर याचा रंग पिंवळा असून गुलाबी असतो. यांतील बीं मोठी असते. याच्या वरील जाड साल असते ती खातात. हें फळ खातांना गुलाबाच्या फुला सारखा वास येतो. याचीं झाडें बियापासून होतात व जड दाबून केलीं असतांही होतात, परंतु बियाच्या झाडापेक्षां जड दाबलेल्या झाडास फळें लौकर येतात.

**चिकू**-हें झाड सुमारें पेरूच्या झाडा येवढें वाढतें. याचीं पानें बकुळीसारखीं असून थोडीं जाड असतात. हें झाड वाढण्यास बरेच दिवस लागतात व फळें येण्यास तीनचार वर्षें लागतात. याचें फळ सुमारें पेरू

पेवढें असतें व थोडें लांबट असतें. फळाचा रंग बाहेरून पिंवळट असून राखेच्या रंगासारखी थोडी झांक मारते व हें खाण्यास फार मधूर लागतें. यांत एक किंवा दोन शिताफळीसारख्या लहान बिया असतात. याला फळें पुष्कळ लागतात. याचीं झाडें बियापासून होतात व जडापासूनही होतात, याचीं फळें ज्येष्ठआषाढामध्यें पिकतात. हें झाड कांहींसें सुरू सारखें समोर वाढतें व पानें हिरवींगार दाट असल्याकारणानें फार सुरेख दिसतें. हें झाड कोणच्याही जमिनीत होतें. याला पाणी विशेष लागतें.

**तूत**—हें झाड साधारण पेरूच्या झाडा येवढें असतें. याच्या तीन जाति आहेत. एकीला लेंडी तून म्हणतात, म्हणजे हिचीं तुतें लहान असतात, नून झालीं म्हणजे लाल दिसतात व पिकल्यावर काळीं होतात; व दुसरीं सुमारें बोटभर लांब होतात. एकीचा रंग पिकल्यावर पिंवळट असतो, एकीचा तांबडा होतो. ह्याला कोणच्याही प्रकारची जमीन चालते पाणी मात्र विशेष पाहिजे. याचीं फळें खाण्यास मधूर लागतात व हीं खाल्लीं असतां जंताचा विकार नाहींसा होतो. लांब तुतीच्या झाडाचीं पानें मोठीं असून आकार कांहींसा धामणीच्या पानासारखा असतो. याचीं कलमें लागतात. याचीं फळें पिकण्याचा हंगाम माघफाल्गुन हा होय.

**द्राक्षें**—हा एक वेल आहे. याचीं कलमें व जड जगतात. याला कोणच्याही प्रकारची जमीन चालते, परंतु तांबडी माती विशेष मानवते. याला कुजलेल्या पाल्याचें खत चांगले मानवतें. याला फळें येत नाहींत म्हणून लोकांची नेहमीं कुरकूर असते. तर याचा प्रकार असा आहे कीं, जमिनींत लावून जगल्यावर हा बुडाजवळच छाटावा. नंतर याला तीनचार धुमारे फुटतील ते सुमारे दोनदोन हात वाढूं द्यावेत, नंतर चार बाजूस चार काठ्या दोनदोन हातांच्या अंतरानें पुराव्या. काठ्या दोनदोन हात उंचीच्या पुराव्या व तो प्रत्येक वेल त्या काठीस बांधावा. आणि तो वेल काठीपासून वीत दीडवीत पुढें गेला म्हणजे छाटावा. व त्याला ह्या चार कोंबांशिवाय दुसरे काठीच्या खालीं फुटूं देऊं नये, व काठीपासून

पुढें वीत दीडवीत ठेवलेल्या वेलास मात्र अंकूर फुटूं द्यावेत. फुटून लांब गेल्यावर जरा जून झाले म्हणजे काठीच्या टोकापासून वीत दीडवीत राखून पुढें छाटावे म्हणजे एक वेलास बुडापासून दोन हाताच्या अंतरावर पांचसात वेलांचा झुपका होईल. असें दोन वर्ष करीत गेल्यावर त्याचा वेल बोटा येवढा जाडी होईल व तिसऱ्या वर्षी काठीपासून पुढें छाटून झालेल्या झुपक्याग पुष्कळ धुमारे फुटतील ते भाद्रपद शुद्धपक्षांत काठीपासून वीत दीडवीत ठेवून तोडून टाकावे. खालच्या वेलास फूट फुटूं देऊं नये आणि खालीं बुडापाशीं थोडें खणून त्याला कुजलेल्या पाल्याचें खत अगर कोणचेंही खत घालून आळें करावें आणि पाऊस नसल्यास पाणी द्यावें म्हणजे ह्याला आश्विन मासीं त्या पुढच्या पंजास पुष्कळ द्राक्षांचे घोंस लागतील व कांहीं काठीच्या खालींही घोंस येतील. याला धुक्याचें भय आहे व वळवाचे पावसाचें पाणी घोंसावर सांचूं देऊं नये. पाऊस पडल्याबरोबर तो वेल हळू हालवून वरील पाणी खालीं पडेल असें करावें. रात्रीं पाऊस पडला तरी उठून तो वेल हालविला पाहिजे. असें न केल्यास त्या थेंबापासून किडे उत्पन्न होऊन द्राक्षांचा नाश होईल. ह्या बारास मिठाबार असे म्हणतात. याप्रमाणेंच चैत्रवैशाख मासींही द्राक्षें येतात, त्या बारास खटाबार असें म्हणतात. परंतु हा बार धरिला नाहीं तर मिठ्याबारास द्राक्षें पुष्कळ व चांगलीं येतात.

**नारळ**—हें झाड समोर उंच वाढणारें आहे. याला खारी हवा विशेष मानवते. परंतु हें झाड बहुतकरून सर्व ठिकाणीं होतें. हें काळ्यामातीपेक्षां तांबड्यामातींत चांगलें होतें. याला पाणी विशेष लागतें. समुद्र किनारीं नारळ पांचव्यासहाव्या वर्षी लागास येतात. परंतु घाटावर यास दहाबारा वर्षांनीं फळें येऊं लागतात. घाटावर म्हणजे जेथें खारी हवा नाहीं, तेथें कधीं कधीं मिठाचें खारें पाणी करून घातलें पाहिजे. याला केव्हां केव्हां सुपाऱ्याजवळ एकप्रकारचा किडा लागतो. • त्याला मुंगा म्हणतात, तो आंतील सुपारा खाऊन टाकितो; अशावेळीं बारीक लांब चि-

भटा घेऊन आंतून काढून मारून टाकावा. सुवाशिक सोनचाफ्याचीं व- गैरे उग्र वास येणारीं फुलें त्याच्या शेंडयांत घालून ठेवावीं म्हणजे भुंग्याचा फारसा उपद्रव होत नाहीं. याला कधीं कधीं दाक्षिणवारा बाधतो, म्ह- णजे त्या कडेची बाजू खराब होते. त्या वेळेस त्याला सभोंवतीं गव- त गुंडाळून ठेवावें. या झाडाच्या फळाचा उपयोग तर सर्वांस माहित- च आहे, परंतु याच्या सर्व अवयवांचे चांगले उपयोग होतात खोडाचीं बहालें होतात व पाण्याचे नळ होतात. झावळीचे झाप घर शाकारण्या- स उपयोगीं पडतात. नारळाच्या बाहेरील सालाचा काथ्या होतो व झाव- ळीच्या हिराच्या केरसुण्या होतात. याची दारू निघते; असे याचे अने- क उपयोग आहेत.

**सफरजंग**—हें झाड सुमारें पेरू येवढें वाढतें. याला कोणच्याही प्र- कारची जमीन असली तरी चालते, परंतु तांबडया मातींत हें झाड चां- गलें होतें. याला पाणी पुष्कळ पाहिजे म्हणजे नेहमीं गारठा असावा लागतो. याला ऊन न लागे अशा ठिकाणीं लावावें. हें लावल्यापासून चवथ्या- पांचव्या वर्षी याला फळें येतात. याचें फळ गोल वाटोळें गुळगुळीत असून पेरू येवढें असतें, त्यामध्यें एखाद्या फळांत बारीक बीं असते. याची रुचि कांहींशी काशीकडच्या बोरासारखी आहे. हीं फळें बाजारांत हमेशा नजरेस पडतात, परंतु याचा हंगाम म्हटला म्हणजे चैत्र वै- शाख हे महिने आहेत. याचीं झाडें बियापासून होतात व जडापासूनही होतात.

**पांढरा जांब**—हें झाड मोठें वाढतें व हें कोणच्याही जमिनींत होतें. लहान असतांना पाण्याचा बंदोबस्त ठेविला म्हणजे झालें. याचीं पानें कांहींशीं जांभळीच्या पानासारखीं असून थोडीं रुंद अस- तात. याला चैत्रमासीं तांबुसरंगाचीं फुलें येतात तेव्हां हें झाड फार सुरेख दिसतें व याला सफेत पांढरे जांब पुष्कळ येतात. यांना पाखरा- चा उपद्रव फार होतो, त्या वेळेस त्यावर जाळें वगैरे घालावें लागतें. हे खाण्यात जरा आंबुस लागतात. आंत बीं मोठी असते. याचीं झाडें

बियापासून होतात व जडही जगतात. झाडाला पानें वगैरे पुष्कळ असल्याकारणानें फार सुशोभित दिसतें.

**पिंपळी**—हा एक लहानसा वेल आहे, याला कोणच्याही प्रकारची माती असली तरी चालते. पाण्याचा गारठा विशेष पाहिजे. ऊन फार नसेल अशा ठिकाणीं हें झाड लावावें. याला पिंपळ्या चैत्रवैशाख मासीं पुष्कळ येतात. या वाळवून ठेवून मधांत उगाळून खाल्ल्या असतां खोकला नाहींसा होतो. याचीं पानें नागवेलीच्या पानासारखीं कांहींशीं असून वाटोळीं असतात. याचीं कलमें जगतात.

**नागवेल**—हा वेल बहुतकरून हिंदुस्थान देशांत सर्व ठिकाणीं होतो. ह्याला तांबडी केवटयाची माती चांगली मानवते. याचीं कलमें जगतात. हा वेल लावल्यावर एक वर्षानें खालीं उतरून त्याचें वेटोळें करून तो वेल कांहीं दिसेल कांहीं ठिकाणीं न दिसेल अशा बेतानें त्यावर माती घालावी. म्हणजे त्याला चोहोंकडून धुमारे फुटून मोठ्या जोरानें वेलाचा झुपकाचा झुपका झाडावर चढतो आणि त्याला पुष्कळ पानें सांपडतात. याला ऊन व वारा न लागे अशा ठिकाणीं लावावा व याला वर्षास केवटयाची माती आंत राख मिसळून तें खत घालावें. पानमळे करण्याची रीति अशी आहे कीं, जमीन सारखी चौरस करून त्यांत शेवरीची अगर पांगाऱ्याचीं झाडें चोहोंकडून लावावीं व आंतून दंडास हीं झाडें लावावींत वाफे नीट नेटके करून मातींत खत मिसळून नंतर दुसरे वर्षी पानमळा लावितात. त्याला कधीं कधीं कीड पडून पानमळ्याची फार नासाडी होते. त्या वेळेस त्यावर राख टाकावी, गोमुत्र शिंपावें, तंबाखूचें पाणी करून शिंपावें म्हणजे किड्यांचा उपद्रव कांहीं कमी होतो. परंतु पानमळा नेहमीं स्वच्छ ठेविला म्हणजे किडयाचा उपद्रव होत नाहीं. यामध्यें दोन जाति आहेत, एक काळी व दुसरी देठी. काळीचें पान वाटोळें असून दडस असतें व खाण्यास फार तिखट लागतें व त्यास एक चमत्कारिक वास येतो.

**फणस**–हा वृक्ष फार मोठा होतो. हें झाड डोंगराळ जमिनींत फार चांगलें व लौकर होतें. काळ्या जमिनींत होण्यास आयास लागतात. हें झाड लहान असतें तेव्हां पाण्यास जपावें लागतें, मोठें झाल्यावर पाण्याची फारशी गरज नाहीं, परंतु याला मोठेपणीं पाणी मिळालें असतां फणस पुष्कळ व मोठे येतात. यामध्यें दोन जाति आहेत. एक कापा व दुसरा बरका. हें झाड लावल्यापासून फणस येण्यास दहाबारा वर्षें लागतात. कापे फणसाचे झाडाची साल फार औषधी आहे. खरूज, पैण वगैरे त्वचेचे रोग झाले असतां साल उगाळून वर गंधासारखी लावावी व पोटांतही घ्यावी म्हणजे हे रोग नाहींसे होतात. कापे फणसाच्या खोडांतून भाकरीसारखा एक पदार्थ बाहेर पडतो त्याला पळसांबे म्हणतात. जीभ फुटते किंवा तोंड फुटतें त्याला हे पळसांबे उगाळून लाविले असतां बरें होतें. फणसाचें लांकूड फार मजबूत व टिकाऊ आहे. फणसाच्या गऱ्याची फणसपोळी करितात व हिरव्या फणसाची भाजी करितात.

**बदाम**–हें झाड बहुतकरून थंड देशांत चांगले होतें. या देशांत जीं बदामाचीं झाडें आहेत, त्याचीं पानें फार मोठीं असतात व आंतील बदाम फार लहान असतो. दुसरा बदाम ज्यास कागदी बदाम म्हणतात; त्याचीं पानें फार बारीक असतात. हें झाड कोणच्याही जमिनींत होतें,परंतु याला पाणी विशेष पाहिजे. बदाम पिकल्यावर याची साल लाल होते व त्याच्या आंत पांढरा बदाम निघतो व तो फोडला म्हणजे खाण्यालायक एक किंवा दोन बिया आंत निघतात. बदाम पुष्टकारक आहे व याचें तेलही काढितात.

**ब्रेडफ्रूट**–याला या देशांत विलायती फणसाचें झाड म्हणतात. हें येरंडासारखें लौकर वाढतें. हें तांबडया जमिनींत चांगलें होतें. याला सदोदित ओलाव्याची जमीन पाहिजे, म्हणजे पाणी पुष्कळ पाहिजे. लावल्यापासून तिसऱ्या वर्षीं यास फळें येऊं लागतात. हीं फळें नारळा येवढालीं असतात, याची बहुतेक आकृति फणसासारखीच असते, आंत गरे अ-

सतात, आठळ्या असतात, परंतु गऱ्यांवर दळ नसतें. याची भाजी फार उत्तम होते. दक्षिण अमेरिकेंत रानटी लोक हे फणस विस्तवांत घालून भाजितात आणि वरची साल काढून पावासारखे तुकडे पाडून खातात. याला हात हात लांब पानें असतात व बोटासारखीं कातरलेलीं असतात. याचें लांकूड अगदीं ढिसूळ आहे.

**लिची**–हें झाड फार मोठें होतें. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. याला लहानपणीं पाणी विशेष पाहिजे. मोठें झाल्यावर याला पाण्याची विशेष गरज नाहीं. हें झाड बियापासून व जडापासूनही होतें. याला फळें येण्यास दहाबारा वर्षे लागतात. याचें फळ खाण्यास फारच उत्तम आहे.

**वेलदोडा**-हें लहानसें हळदीसारखें वाढणारें झाड आहे. याला तांबडी माती लागते. हें झाड बियापासून होतें. वेलदोडे येण्यास तीन वर्षे लागतात. या झाडास आवळीच्या पाल्याचें खत विशेष मानवतें. हें झाड फार ऊन न लागेल व सदोदित याच्या आसपास पाणी वहात राहील, अशा ठिकाणीं लावावें. ह्या झाडाला खालीं मुळ्या असून जमिनी बरोबर लांबलांब भुयमुगासारख्या आऱ्या फुटतात. त्यांना फुलें येऊन वेलदोडे येतात. सुपारीची व केळीची बाग असते त्यांत हें लावितात म्हणजे यांस छाया असून पुष्कळ पाणी असल्याकारणानें त्या झाडास इजा होत नाहीं.

**सुपारी**–हें झाड समोर वाढणारें आहे. हें काळे मातीपेक्षां तांबड्या मातींत चांगलें होतें. याला पाणी पुष्कळ लागतें व जेथें फार ऊन लागतें तेथें हें झाड होत नाहीं. याची एक बाजू कधीं कधीं करपून गेल्यासारखी होते, त्याला दक्षिण बाधली असें म्हणतात. तर त्यास अशा वेळेस गवत बांधावें. सुपाऱ्या रुजत घातल्यापासून तीन महिन्यांनीं उगवतात व या झाडास सहाव्या सातव्या वर्षीं सुपाऱ्या येऊं लागतात.

**तमाखू**–याला पीच म्हणतात. हें झाड सुमारें वेढ वेमरें वाढतें.

ह्याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. याला पाणी विशेष पाहिजे. थंड हवेंत हें झाड चांगलें होतें. याचीं पानें झडून गुलाबी रंगाचीं फुलें पुष्कळ येतात व यास फळें सुमारें पेरूयेवढालीं येतात. तीं मागें देंठापाशीं मोठीं असून पुढें निमूळतीं असतात. हीं जून झालीं म्हणजे याला गुलाबी रंग येतो व फळावर बारीक पांढरी लव असते. फळ पिकल्यावर खाण्यास फार मधूर आहे; यांत बदामासारखी बीं असते. हीं फळें चैत्रवैशाखीं पिकतात, त्या वेळेस एखादा पाऊस पडला म्हणजे फळाला कीड लागते, तर त्या वेळेस तंबाखूचें पाणी करून शिंपडलें असतां कांहीं कमी होते.

**हरपररेवडी**–( यास कोठें कोठें राई आंवळी असेंही म्हणतात. ) हें झाड मोठें होतें. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. पाणी मात्र विशेष लागतें. याला चैत्रवैशाखीं मोहोर येऊन पावसाळ्यांत पुष्कळ फळें येतात, तेव्हां हें झाड फार सुरेख दिसतें. हे आवळे खाण्यास थोडे आंबूस असून गोड लागतात. याचें लोणचें करितात. याचीं झाडें बियापासून होतात. हें लावल्यापासून तिसऱ्या चवथ्या वर्षीं यास फळें येऊं लागतात.

**शेव**—हें झाड सुमारें पेरूयेवढें वाढतें. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. लहान असतें त्या वेळेस पाण्यास मात्र जपलें म्हणजे झालें. हें लावल्यापासून पांचव्यासहाव्या वर्षीं याला फळें येऊं लागतात. याचीं जडापासून झाडें होतात, व कलमापासूनही होतात. याचें फळ कांहींसें सफरजंगासारखें असतें, परंतु अगदीं वाटोळें नसतें. हें खाण्यास बोरासारखें लागतें, परंतु आंबट नसतें. याचा मोरंबाही करितात.

**जायफळ**—हें झाड मोठें वाढतें. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. याला पाणी विशेष लागतें. याला समुद्रकिनाऱ्याची खारी हवा चांगली मानवते. हें झाड वाढण्यास पुष्कळ

दिवस लागतात. ह्याच्या पानांचा वगैरे आकार कांहींसा कोकंबासारखा आहे. ह्याचीं फळें वाटोळीं असून कोकंबाच्या फळासारखीं असतात. हीं पिकलीं म्हणजे पिंवळीं होतात व वरची साल काढली म्हणजे आंत वाटोळें फळ निघतें, त्याची कवची फोडली म्हणजे आंत जायपत्री असते व त्याचे आंत जायफळ असतें. याचीं फळें पिकलीं म्हणजे झाड फार सुरेख दिसतें. यांचा पिकण्याचा हंगाम श्रावण व भाद्रपद हे महिने असतात.

**दालचिनी**—हें झाड मोठें होतें. याला तांबूस माती चांगली मानवते. हें लहान असतें तेव्हां याला पाण्याला जपलें म्हणजे झालें. याचीं पानें काहींशीं नागवेलीच्या पानासारखीं असतात. याला समुद्र-किनाऱ्याची हवा चांगली मानवते. हें झाड तीनचार वर्षांचें झालें म्हणजे त्याच्या खांद्यांची साल काढून उन्हांत वाळवितात, तिला दाल-चिनी म्हणतात व फळाचें तेल काढितात. याच्याच वाळलेल्या पानास तमालपत्र असें म्हणतात.

**सावरसोप**—याला कोठें कोठें मामफळ असें म्हणतात. याचीं पानें कांहींशीं बकुळीच्या पानासारखीं असतात. हें झाड सुमारें पेरूच्या झाडा-येवढें वाढतें. याचीं फुलें सिताफळीच्या फुलांसारखीं असून पाकळ्या दड-स व मोठ्या असतात. याच्या फळाचा आकार कांहींसा फणसासार-खा असतो, परंतु फळ फणसापेक्षां लहान असतें. पिकल्यावर आंतील गीर व बीं सिताफळीसारखी असते. हें खाण्यास थोडें आंबूस व गोड लागतें. याचीं झाडें बियांपासून होतात व जडापासूनही होतात. याला को-णचीही जमीन असली तरी चालते, परंतु पाणी मात्र विशेष लागतें. याचीं फळें चैत्र व वैशाख या महिन्यांत पिकतात.

**बिही**—याचें झाड बहुतेक शेवच्या झाडासारखेंच असतें. याचीं पानें वाटोळीं असतात. याला कोणचीही जमीन चालते. पाणी मात्र विशेष पाहि-जे. हीं फळें मोठ्याशा पेरूयेवढीं असतात व थोडीं लांबोळीं असून गुळगु-

ळीत असतात. ह्याचीं झाडें जडापासून होतात व बियापासूनही होतात. फळाची रुचि बोरासारखी असून गोड असते. याचा मोरांबा करितात. याला फळें येण्याला झाड लावल्यापासून पांचसहा वर्षें लागतात.

**आलुबुखार**—याचा आकार कांहींसा शेवसारखाच आहे. याचीं पानें थोडीं लांबोळीं असून पातळ असतात. हें झाड कोणच्याही जमिनींत होतें, परंतु तांबडया मातींत चांगलें होतें. हें झाड थंड प्रदेशांतील आहे. आपले इकडे लावणें झाल्यास जेथें पाणी पुष्कळ असेल, फार ऊन लागणार नाहीं व बागाइताचा गारठा असेल अशा ठिकाणीं लावावें. याचीं झाडें जडा-पासून होतात व बियापासूनही होतात. यामध्यें दोन प्रकार आहेत. लहान फळें येणारा आलुबुखार व मोठीं फळें येणारा आलुबुखार. याचीं फळें नागपुरी बोरायेवढालीं असतात. तीं खाण्यास आंबट असून रुचकर असतात. याचें सार फार उत्तम होतें व तें दुखणेकरी मनुष्यास घालतात.

**बेदाणा**—याचें झाड बहुतकरून आलुबुखारासारखेंच असतें. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. हीं झाडें तांबडया मातीं-त विशेष चांगलीं होतात. हीं फारशीं आपल्या देशांत दृष्टीस पडत नाहींत. हीं बहुतकरून थंड देशांत पुष्कळ आढळतात. परंतु हीं झाडें आमचेपाशीं आहेत. याला फळें येण्याला तीनचार वर्षें लागतात. हें झाड जेथें पाणी पुष्कळ व आसपास जेथें दाट झाडी व गारठा असतो तेथें लावावीं. हीं झाडें जडापासून होतात. बेदाण्यांत तीनचार जाति आहेत. एक बारीक पिवळा बेदाणा असतो व एक हिरवा असतो. दुसरा मोठ्या फळाचा म्हणजे याचीं फळें लहानशा बोराएवढालीं असता-त. एकाचीं काळीं व एकाचीं पिवळीं असतात. यांत मनुकासारख्या बिया असतात. सर्वांची रुचि बहुतकरून जवळ जवळ सारखीच असते.

**म्यांगोस्तीन**—हें झाड मोठ्या पेरूयेवढें होतें. याचीं पानें कांहींशीं कोकंबासारखीं असून थोडीं रुंद व जाडी असतात. हें झाड तांबड्या मा-तींत चांगलें होतें. याला पाणी असून गारठ्याची जमीन पाहिजे. हें झाड

बियापासून होतें व याचे जडही जगतात. यांत दोन जाति आहेत, एक आंबट असतें, व दुसरें गोड असून स्वादिष्ट असतें. याचें फळ कोंकबाप्रमाणेंच असतें व पिकल्यावर पिंवळें होतें. फळाला पिकल्यावर वास फार उत्तम येतो.

**रामफळ**—हें झाड मोठें होतें; व तें कोणच्याही जमिनींत चांगलें होतें. हें लहान असतें तेव्हां याला पाण्याला जपलें म्हणजे झालें. मोठेपणीं पाण्याची विशेष गरज नाहीं, परंतु पाणी मिळालें असतां फळें पुष्कळ येऊन मोठीं येतात. हें झाड लावल्यापासून फळें येण्यास ७।८ वर्षें लागतात. याचीं पानें कांहींशीं सिताफळीसारखींच असतात; परंतु लांबोडीं असतात. याचें फळ साधारण सोललेल्या नारळा येवढें असतें व वरून गुळगुळीत असून देंठाजवळ लाल असतें. रामफळीमध्यें सिताफळीपेक्षां मगज पुष्कळ असतो व बिया कांहींशा सिताफळीसारख्या असतात. याचीं झाडें बियापासून होतात. याचा पिकण्याचा हंगाम चैत्र व वैशाख हे महिने होत.

**सिताफळ**—हें झाड साधारणपेरू येवढें होतें. याचीं पानें रामफळीसारखीं असून थोडीं रुंद असतात. याला जमीन कशी असली तरी चालते. हें झाड लावल्यापासून यास तिसऱ्या वर्षीं फळें येऊं लागतात. याच्या फुलाला उग्रट व वाईट वास येतो. हीं फळें पिकण्याचा हंगाम आश्विन व कार्तिक हे महिने आहेत. याचीं फळें आंब्यायेवढालीं असतात व जून झालीं म्हणजे त्याचा रंग बाहेरून थोडा पांढरा होतो. हें फळ गुळगुळीत नसून त्याजवर खवले असतात. हें फळ खाण्यास गोड लागतें व रामफळासारखा यांत फार मगज नसतो व आंत बिया फार असतात. हें फळ फार थंड आहे. याचीं झाडें बियापासून होतात.

**डाळिंब**—हें झाड चांगल्या जमिनीपेक्षां खडकाळ व तांबूस जमिनींत चांगलें होतें. त्याला पाणी विशेष लागत नाहीं. लावल्यापासून याला तिसऱ्या वर्षीं फळें येऊं लागतात. माघ व फाल्गुन या महिन्यांत आलीं असून

पुढें त्याला महिन्यांतून दोन वेळां पुष्कळ पाणी द्यावें, म्हणजे त्याला चैत्र व वैशाख या महिन्यांत पालवी फुटून फुलें येऊं लागतात. हीं डाळिंबें श्रावण व भाद्रपद या महिन्यांत तयार होतात. हें पित्तशामक आहे. याचा लेह करितात. डाळिंबाच्या फळाची साल उगाळून घेतली असतां हगवण बंद होते. याच्या फळाला कीड लागते तेव्हां हिंगाचें पाणी करून बुडा-जवळ घालितात व वर शिंपडितात, तेणेंकरून कीड कांहीं कमी होते. परंतु ज्या डाळिंबास कीड लागली असेल तें तोडून जाळून टाकावें, असें एकदोन वर्षें केलें म्हणजे कीड बहुतकरून लागणार नाहीं.

**पेरू**—हें झाड बहुतकरून सर्व देशांत असतें. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते, परंतु काळ्या जमिनींत झाड चांगलें येतें. हें लावल्यापासून तिसऱ्या वर्षीं यास फळें येऊं लागतात. हें लहान असतें तेव्हां आठवड्यांतून एक वेळ यास पाणी दिलें पाहिजे. हें मोठें झालें म्हणजे याला पावसाळा सरल्यावर पाणी देऊं नये. माघ व फाल्गुन या महिन्यांत खणणी करून खत घालावें. पहिल्यानें पाणी तोडल्या-कारणानें याचीं पानें गळतील, परंतु खणणी झाल्यावर याचीं आळीं करून आठवड्यांतून एकदां पुष्कळ पाणी देत जावें, म्हणजे चैत्रवैशाखीं पालवी फुटून पुष्कळ फळें लागूं लागतील. हीं फळें आश्विन व कार्तिक या महिन्यांत पिकूं लागतात. पेरू हें फळ थंड आहे, यांत दोन जाति आहेत. गुलाबी व पांढरा. फळांचा बार झाल्यावर पाणी बंद करावें, तें उन्हाळ्यांत खणणी झाल्यावर पुन्हा सुरू करावें.

**जांभूळ**—हें झाड मोठें होतें. याला पहिल्यानें एकदोन वर्षें पाणी घातलें म्हणजे पुढें पाण्याची गरज नाहीं, परंतु पाणी मिळालें तर फळें मोठीं येतात. त्याचें फळ पिकल्यावर काळें होतें. हें फार थंड आहे. हें फळ साधारण पायाच्या आंगठ्या येवढें असून दोनतीन अंगुळें लांब असतें. याच्या बियाची पूड थंड पाण्यांतून घेतली असतां मधुमेहाचा विकार कमी होतो. याचीं फळें पिकण्याचा हंगाम ज्येष्ठ व आषाढ हे महि-

ने असतात. हें लावल्यापासून चवथ्यापांचव्या वर्षी यास फळें येऊं लागतात. याचें लांकूड इमारतीस उपयोगी पडतें.

**करवंद**—हें लहानसें फळझाड आहे. हें डोंगराळ जमिनींत व रानांत फार असतें. यास तांबडी माती चांगली मानवते. हें झाड मोठें झाल्यावर कांहींसें वेलीसारखें वाढतें, यास कांटे असतात. या झाडांस माघ व फाल्गुन या महिन्यांत फुलें येतात. हीं फुलें पांढरीं असतात. हें झाड कोंकणप्रांतीं सर्व रानोमाळ असतें व तेथें त्याचा उपयोग कुंपणाकडे फार करितात. याचीं पानें वाटोळीं असून कोकंबाच्या पानांपेक्षां कांहींशीं लहान असतात. याचीं फळें चैत्र व वैशाख या महिन्यांत पिकूं लागतात. हीं फळें जून झालीं म्हणजे याचें लोणचें करितात.

**आवळी**—हें झाड मोठें होणारें आहे. याला विशेष पाण्याची गरज नाहीं. हें कोणच्याही जमिनींत होतें, परंतु तांबडी जमीन याला चांगली मानवते. याला फळें येण्याला ६।७ वर्षें लागतात. हे आवळे आश्विन कार्तिक या महिन्यांत पिकूं लागतात. याचें लोणचें करितात व मोरावळा करितात. हे पित्तशामक आहे. याचीं झाडें बियांपासून होतात.

**तोरण**—हें डोंगराळ जमिनीमध्यें वाढणारें लहानसें कांटेरी झाड आहे. याला विशेष पाण्याची गरज नाहीं. याला चैत्र व वैशाख या महिन्यांत पुष्कळ फळें येतात. याचा रंग पांढुरका असतो. आंत बीं मोठीं असून वर दळ थोडें असतें. मुलांना देवीचा ताप आला तर देवी येण्याच्यापूर्वी या तोरणीच्या झाडाची साल थंड पाण्यांत उगाळून दिली असतां देवी येत नाहींत असें म्हणतात. याच्या फळाची रुचि थोडी गोड असून तुरट असते.

**बोर**—हें मोठें वाढणारें झाड आहे. याला पाण्याची विशेष गरज नाहीं. हें झाड तांबड्या मातीपेक्षां काळ्या जमिनींत चांगलें होतें. बोरीमध्यें दोनतीन जाति आहेत. नागपूर व अमदाबादेकडे जा बोरें असतात तीं लांब व मोठीं असतात, त्यांमध्यें आंबूसपणा कमी असतो. दुसरीं हल-

हे जीं लहान व वाटोळीं बोरें नजरेस पडतात, त्यांत आंबटपणा विशेष असतो. गुजराथ प्रांतामध्यें कांहीं बोरीचीं झाडें आहेत, त्यांना बोरें मोठ्या-शा हरबऱ्या येवढीं येतात, तीं वाळवून इष्टमित्रांस परदेशीं मेवा पाठवीत असतात. बोरीचें झाड बहुतकरून हिंदुस्थानांत सर्व ठिकाणीं होतें. बोरांवर संध्या नारिंग्यासारखा डोळा बांधिता येतो. याचीं झाडें बियापा-सून होतात.

**बाकाळी**—हें अगदीं लहान वाढणारें झाड आहे. हें बहुतकरून डोंगराळ देशांत रानांत आपोआप उगवतें. याला फुलें तांबडीं येतात व त्याला पाकळ्या चारच असतात. व याचें फळ तांबड्या रंगाचें असतें, हें गोड असून थोडें तुरट असतें. याची मुळी धावरें वगैरे होऊन अक-स्मात आंगास सूज येते त्या वेळेस उगाळून लाविली असतां सूज नाहींशी होते असें म्हणतात.

**आंबाडा**—हें मोठें वाढणारें झाड आहे. याला पाण्याची गरज विशे-ष नाहीं. हीं झाडें काळ्या मातीपेक्षां तांबड्या मातींत चांगलीं होतात. हें लावल्यापासून ३ ऱ्या वर्षीं यास फळें येऊं लागतात. याचीं फळें कांहीं-शीं शेवासारखीं असतात, परंतु शेवापेक्षां लहान असतात. याचें लो-णचें करितात.

**भोंकर**-हें मोठें वाढणारें जंगली झाड आहे. याला कोणच्या प्रकारची जमीन असली तरी चालते. याचीं फळें पिकल्यावर पिवळीं होतात. हें खाण्यास थोडें गुळचट आहे. याच्या हिरव्या फळांचें लोणचें करितात. याचीं फळें बोराएवढालीं असतात.

**गोंधण**-हें मोठें वाढणारें झाड आहे. याला कोणत्याही प्रकारची ज-मीन असली तरी चालते. याचीं फळें पिकल्यावर लाल रंगाचीं होतात. हें खाण्याला थोडें गुळचट असून बुळबुळीत असतें.

**चार**-हें जंगलांत वाढणारें मोठें झाड आहे. याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. याला पाण्याची विशेष गरज नाहीं. याच्या पानाच्या पत्रावळी करतात. याच्या

पिकलेल्या फळाचा वरील भाग मनुकासारखा गोड लागतो. याच्या आंत बारीक बी असते, ती फोडली म्हणजे बारीक पिस्त्यासारखी बी निघते, ती मिठाईंत घालितात.

**आळू**-हें लहानसें जंगलांत वाढणारें झाड आहे. या झाडाला मोठमोठे कांटे असतात. याला फळें लहानशा पेरूएवढीं येतात, व पिकल्यावर तपकिरी रंगाचीं होतात. खाते वेळेस त्यांस एक प्रकारचा वास येतो. हीं झाडें बहुतकरून तांबड्या मातींत होतात.

**ताडगोळा**-हें झाड कांहींसें नारळासारखें वाढतें. हीं झाडें समुद्रकिनारीं खाऱ्या मातींत चांगलीं होतात. याला आंब्याएवढीं फळें येतात. तीं कोंवळीं असतात तेव्हां सोलून आंतील गीर काढितात. तो सुपारीसारखा वाटोळा असतो, तो खाण्यास गोड लागतो. हें फळ जून झाल्यावर फोडलें असतां नारळासारखें आंत खोबरें सांपडतें, परंतु तें चावत नाहीं. याची दारू काढितात. हें झाड लहान असतें तेव्हां फार सुरेख दिसतें.

**बिबा**-हें झाड मोठें वाढणारें आहे. याचीं पानें कांहींशीं काजूच्या पानासारखीं असतात व फळाची आकृतीही कांहींशी काजूसारखीच आहे. याचीं बोंडें काजूपेक्षां लहान असतात, तीं खाण्यास गोड लागतात, या बोंडांचे खालीं बी असते, तिला बिबा असें म्हणतात. याचे बियाचे तेल ठेंच लागली अगर हातपाय कोठें दुखत असल्यास लाविलें असतां बरें होतें. या बिब्यांतील बी काजूसारखी गोड लागते. हें झाड बहुतकरून तांबड्या मातींत होतें. याला विशेष पाण्याची गरज नाहीं.

**खारीक**-हें झाड समुद्रकिनारीं चांगलें होतें. याची दारू काढितात. शिंदी, खजूर व खारीक हीं बहुतकरून जवळ जवळ सारखींच असतात. यास फुलें येतात, त्यांत कांहीं स्त्रीजातीचीं व कांहीं पुरुषजातीचीं असतात. पुरुषजातीचीं फुलें पाहून तीं स्त्रीजातीच्या फुलावर झाडावीं, म्हणजे खारकेचीं फळें मोठीं होतात, असें न केलें तर तीं फळें तशींच लहान राहतात. हें कृत्य बहुतकरून या फुलावरून त्या फुलावर उडणारीं पांखरें करितात.

**केप गुजबरी**-हें एक फळझाड आहे. याचें बीं पाऊस पडण्याच्या सुमारास खतावलेल्या जाग्यांत पेरावें, व त्याचें रोप चारसहा बोटें उंच झालें म्हणजे दोनदोन हातांचे अंतरानें चांगल्या जमिनींत लावावें. याचीं फळें गुळचट असून आंबट असतात. हीं पिकल्यावर यांचा एक प्रकारचा खाण्याचा पदार्थ करितात, व हीं तशींच खातात. यास कोणतेंही कुजलेलें खत घातलें असतां मानवतें.

ह्या फळाचा आकार सुपारीएवढा असतो, वरची साल काढली म्हणजे आंत अर्ध्या सुपारी येवढी गोळी सांपडते. पिकल्यावर हीं फळें पिवळीं होतात. गुजबरीवाईन म्हणून एक दारूची जात आहे, ती याचीच करितात. याचीं कलमेंही जगतात. त्याला इकडे कांहीं लोक ढोलांबा असें म्हणतात.

**स्ट्राबेरी**-हें एक वेलासारखें वाढणारें लहानसें झाड आहे. यास तांबूस माती व थंड हवा मानवते. यास उन्हाळ्यांत तांबडीं फळें येतात, तीं थोडीं गोड असून आंबूस असतात. याच्या मुळ्याला झाडें फुटतात, तीं निराळीं करून लाविलीं असतां जगतात; व याचीं कलमेंही जगतात. याचीं फळें तांबडीं असून थोडीं लांबोडीं असतात. व त्या फळालाच चिकटून बीं असतें. फळ सुमारें सुपारीएवढें मोठें असतें. याच्या बियापासूनही झाडें करितां येतात. हें फळ फार नाजूक आहे. या झाडाला पाणी विशेष लागतें.

**राजपुरी**-याचें बीं पाऊस पडण्याचे सुमारास चांगले खतावलेले जाग्यांत पेरावें. याचें रोप चारसहा बोटें उंच झालें म्हणजे दोन हातांचे अंतरावर एकेक झाड लावावें. यास कांटे असतात. हें गुलाबासारखें दिसतें. यास पांढरीं फुलें येतात, व याला थंड हवेची जागा मानवते. याचीं कलमेंही जगतात. यास फळें काळीं येतात, तीं थोडीं आंबट असून गुळचट लागतात.

**ब्लॅकबरी**-हें एक फळझाड आहे. हें गुलाबासारखें असून वेलासार-

खें वाढतें. याचीं जडापासून झाडें होतात व बियापासूनही होतात. याला कुजलेलें खत व तांबडी माती चांगली मानवते. याला जशीं थंड देशांत फळें येतात तशीं उष्ण देशांत येत नाहींत.

**मोह**—हा मोठा वाढणारा वृक्ष आहे. हा कोणच्याही जमिनींत होतो. याला लहानपणीं पाण्याला जपलें म्हणजे झालें. गुजराथमध्यें याची लागवड केलेली बरेच ठिकाणीं आढळते. याचीं पानें सुमारें वीत सवावीत लांब असतात व सातआठ बोटें रुंद असतात. हें झाड लावल्यापासून नऊदहा वर्षांनीं त्यास फळें येऊं लागतात. याच्या फुलाची दारू करितात व तीं तशींच खातात, तीं गोड लागतात. याच्या फळाचें तेल काढितात, तें खाण्याच्या व जाळण्याच्या उपयोगीं पडतें. हें मोठें असलें तर एक झाडापासून सातआठ मण फुलें व चारपांच मण फळें सांपडतात, म्हणजे सरासरी एका झाडापासून दहापंधरा रुपये उत्पन्न होतात.

**बिलंबी**—हें फळझाड आहे. हें सुमारें वीसपासून पंचवीस हात वाढतें. यास फुलांचे झुबकेचे झुपके येतात, तेव्हां हें झाड फार सुरेख दिसतें. याचें पिकलेलें फळ मऊ असतें. याच्या फळावर द्राक्षासारखी पातळ साल असते. या फळास आंबट वास येतो, याचें लोणचें करितात व मोरंबाही करितात. याचीं झाडें बियापासून होतात. याचीं झाडें लहानपणीं फार नाजूक असल्यामुळें त्यास विशेष जपावें लागतें. या झाडास तांबडी जमीन चांगली मानवते. यास मोहोर उन्हाळ्यांत येतो व फळें हिंवाळ्यांत पिकतात.

**बेल**—हें एक उंच वाढणारें झाड आहे. याच्या फांद्यांस कांटे असतात. याचीं पानें एका देंठास बहुतकरून तीनच असतात. याच्या फळास बेलफळ असें म्हणतात. याचीं फळें कंवठा येवढीं असतात, त्यावर कंवठासारखेंच कठिण टरफल असतें, याचा आंतील मगज पिंवळा असतो तो खाण्यास गुळचट लागतो व तो हगवणीवर उपयोगी पडतो. याच्या फळाच्या सालीचा रंग करण्याकडे उपयोग करितात. नवीन झाडें

बियापासून करितात व त्याच्या मुळ्यांना लहान झाडें फुटतात तीं काढून लाविलीं असतां जगतात. हें झाड कोणच्याही जमिनींत होतें. हिंदु लोकांत याचीं पानें पूज्य मानिलीं आहेत.

**संत्रे, नारिंगें, मोसंबी, कवलें.**—या सर्वांची लागवड एकसारखीच आहे. हीं झाडें बहुतकरून सर्वत्र ठिकाणीं होतात. परंतु जेथें पावसाळा फार आहे तेथें जशीं व्हावीत तशीं होत नाहींत. हीं झाडें काळ्या जमिनींत होतात, परंतु नदीच्या केवटयाची जमीन यांना विशेष मानवते. हीं झाडें सातआठ फुटांच्या अंतरानें लावावीत. हीं झाडें बियापासून चांगलीं होत नाहींत, सबब लिंबाचें अगर इडालिंबाचें बीं पेरून त्याचीं रोपें दोनतीन वर्षांनीं करंगळी एवढीं जाडी झालीं म्हणजे त्यावर चांगल्या संत्र्या नारिंग्याचे डोळे काढून बांधावेत, हे बांधण्याचे दिवस म्हटले म्हणजे चैत्रवैशाख अगर भाद्रपदआश्विन हे होत. म्हणजे ज्या वेळेस हीं झाडें फुटत असतात, ती वेळ चांगली. मध्यें कोणच्याही वेळीं बांधले तरी जगतात. हे डोळे बांधल्यावर लागलाच जर पाऊस पडला तर मात्र ते जगत नाहींत. हे डोळे जगून महिना दोन महिने झाले म्हणजे बांधलेल्या डोळ्यावर दोन बोटें साधी काडी राखून वरचा शेंडा तोडावा, म्हणजे बांधलेला डोळा फुटूं लागतो आणि मूळच्या झाडाच्या अंगास बारीक बारीक खांद्या फुटतात त्या काढून टाकाव्यात, फक्त बांधलेला डोळा मात्र वाढूं द्यावा आणि तो डोळा चारसहा बोटें लांब झाला म्हणजे त्याचा पुढचा शेंडा थोडा तोडावा म्हणजे त्या बांधलेल्या डोळ्याला पुष्कळ खांद्या फुटूं लागतात. हें झाड लावल्यापासून तिसऱ्या वर्षीं याचा बार धरावा. लहान असतें तेव्हां याला आठवडयांतून दोनदां पाणी द्यावें. पुढें मोठें झाल्यावर महिन्यांतून चार वेळां पाणी दिलें म्हणजे पुरें होतें. लावतेवेळेस खड्यांत कुजलेलें खत थोडथोडें घालून लावावींत, नंतर वर्षांतून फाल्गुन व चैत्रवैशाख या महिन्यांत खणणी करून याला खत घालावें आणि नंतर पाणी द्यावें.

**पपनस**-हें लिंबाच्या जातीपैकीं एक मोठें वाढणारें झाड आहे. हीं झाडें बियापासून होतात व इडलिंबावर याचा डोळा बांधूनही होतात. याचे जड जगतात व कलमेंही जगतात. हीं झाडें कोणच्याही जमिनींत चांगलीं होतात. याचें चांगलें मोठें फळ दोन अडीच शेर वजन भरतें. याला वर्षांतून दोनदां फुलें येतात, तीं पांढरीं असतात व त्यास पुष्कळ वास असतो. याच्यांत दोन जाति आहेत. एकाची साल पातळ असते व एकाची जाडी असते व त्या फळांतल्या मगजाचा सुद्धां दोन प्रकारचा रंग असतो. एकाचा लाल असतो व एकाचा पांढुरका असतो. हें झाड पुष्कळ वर्षें टिकतें व जमीन चांगली असल्यास त्याचा बराच मोठा वृक्ष होतो. याचीं पानें संत्र्यानारिंग्यापेक्षां मोठीं असतात. याला फळें आलीं म्हणजे हा वृक्ष फार सुरेख दिसतो. हें झाड लहान असतें तेव्हां याला आठवड्यांतून दोन वेळ पाणी द्यावें व मोठें झाल्यावर यास आठवड्यांतून एक वेळ पाणी दिलें म्हणजे पुरें होतें.

• **साखरलिंबू**-हें एक संत्र्या नारिंग्यासारखेंच वाढणारें झाड आहे. हें झाड बियापासून होतें व इडलिंबाच्या झाडावर डोळा बांधूनही होतें. हें कोणच्याही जमिनींत होतें व फळ साधारण मोठ्याशा पेरू येवढें होतें. पिकल्यावर त्याचा रंग पिवळा होतो. याला फळें पुष्कळ येतात. हें खाण्यास फार आंबटही नाहीं व फार रुचकरही नाहीं. याला फळें येतात तेव्हां हें झाड फार सुरेख दिसतें. या फळांचा बार गेला म्हणजे सभोंवतीं खणून त्याला खत घालून पाणी द्यावें, म्हणजे हें पुन्हा फुटून त्याला पुष्कळ फळें येतात.

**महाळुंग**-हें लिंबाच्या जातीपैकींच एक फळझाड आहे. याचीं पानें कांहींशीं पपनसासारखीं असतात व या झाडाला कांटे बरेच असतात. हें झाड तांबड्या मातींत अगर काळ्या मातींतही चांगलें होतें. लहान असतें तेव्हां याला चार दिवसांनीं पाणी द्यावें व मोठें झाल्यावर आठवड्यांतून एकदां पाणी दिलें म्हणजे पुरें होतें. याला फळ लहानशा पपन-

सा येवढें येतें, व तें गुळगुळीत नसतें, त्यावर खळगे असतात. पिकलें म्हणजे याची वरची साल पिंवळी होते, ती साल कापून काढिली म्हणजे आंतील भाग खाण्यास गोड लागतो व मधला गीर आंबट असतो. याचें लोणचें करितात व मोरंबाही चांगला होतो. ह्या फळाला वास उत्तम येतो. हें झाड लावल्यापासून यास तिसरे चौथे वर्षी फळें येऊं लागतात व याला फळें येऊन याच्या खांद्या वांकतात, तेव्हां याला काठ्या वगैरे लावाव्या लागतात.

**इडलिंबू**-याचें झाड बरेंच मोठें पपनसासारखें वाढतें. याचीं पानें पपनसापेक्षां लहान आहेत व फळेंही लहान आहेत. फळें वरून गुळगुळीत नसतात. याचीं झाडें बियापासून होतात व हीं कोणच्याही जमिनींत होतात. लहान असतें तेव्हां याला चार दिवसांनीं पाणी द्यावें, मोठें झाल्यावर आठवड्यांतून एक वेळ पाणी द्यावें. याचीं फळें आंबट असतात, याचें लोणचें करितात व या फळांचा रस काढून पागोटीं वगैरे रंगविण्याच्या कामीं लावितात. हें झाड लाविल्यापासून याला तिसऱ्या चौथ्या वर्षी फळें येऊं लागतात. एकदां लाविलें म्हणजे हें पुष्कळ वर्षें राहतें.

**कागदी लिंबू**-हें एक लहानसें वाढणारें फळझाड आहे. हें पपनसायेवढें मोठें वाढत नाहीं. याचीं पानें बारीक असतात. हीं झाडें बियापासून होतात. याच्या दोन जाति आहेत. एकाची साल पातळ असते व एकाची जाडी असते. याचें लोणचें करितात व तें औषधास उपयोगीं पडतें. या फळाचा रस काढून रंगारी लोक कपडे रंगविण्याच्या कामीं त्याचा उपयोग करितात. याच्या रसाचें सरबत करितात. हें फळ पिकलें म्हणजे पिंवळें होतें. हें झाड मोठें होण्यास बरींच वर्षें लागतात, हें तांबड्या मातींत व काळ्या मातींतही चांगलें होतें. हीं झाडें तक्त्यांत लावणें झाल्यास सुमारें आठआठ फुटांच्या अंतरानें लावावींत.

**पांपी**-हें एक उंच वाढणारें फळझाड आहे. हें समारें दहापंधरा हात

उंच वाढतें. याचीं पानें हिरवींगार दिसतात, यामुळें हें झाड फार सुरेख दिसतें. याला पांढऱ्या फुलांचे घोंसचे घोंस येतात व फुलाला वास असतो. याला फळें सुमारें लिंबाएवढीं येतात. याची साल वरून कांहींशी नारिंगासारखी असते. यांतील गीर खातात, त्यांत तीन बिया सांपडतात. याचीं झाडें बियापासून होतात व जड दाबूनही होतात. हीं झाडें तांबड्या मातींत व काळ्या मातींतही होतात. लहान असतें तेव्हां याला आठवड्यांतून तीनदां पाणी द्यावें व मोठें झाल्यावर यास आठवड्यांतून एकदां पाणी दिलें तरी पुरे आहे.

**लोकाट**–हें झाड फार मोठें वाढत नाहीं. याचीं पानें मोठीं असून लांबट असतात. यास पावसाळा लागण्याच्या सुमारास व पावसाळा संपता असा दोनदां मोहोर येतो, पण यास फळें हिंवाळ्यांत लागतात. याच्या फुलाचा रंग पांढरा असून त्यांचे झुपकेचे झुपके येतात. फळें कांहींशीं लांबट बोराच्या आकाराचीं असून त्यांचा रंग पिवळा असतो. हीं फळें फार गोड नसतात. याचीं नवीन झाडें बियापासून होतात. ह्याच्या बिया फळांतून काढल्याबरोबरच लावल्या पाहिजेत, नाहीं तर त्या उगवत नाहींत. हें लहान असतें तेव्हां यास आठवड्यांतून दोनदां पाणी द्यावें. बार आला म्हणजे वरचेवर पाणी व आठवड्यांतून एकदां पातळ खत द्यावें, असें केल्यानें फळें मोठीं येतात. हीं झाडें कोणच्याही जमिनींत होतात.

**आंबा**–हें सर्व फळांतील उत्तमांपैकीं एक आहे. हीं झाडें उष्ण देशांत होतात, आपले देशांत जितकीं आंब्याचीं झाडें आहेत तितकीं दुसऱ्या कोणच्याही देशांत नाहींत. हीं झाडें आंब्याच्या कोईपासून होतात, परंतु कोईपासून झालेल्या झाडांचीं फळें पहिल्या आंब्यासारखींच नेहमीं निपजतात असें नाहीं. आंब्याच्या जाति इतक्या आहेत कीं, त्याचें थोडक्यांत वर्णन केलें तरी एक मोठा ग्रंथच होईल. आंब्याचें झाड शेंदोनशें वर्षें टिकतें. त्याच्या फळाचा आकार निरनिराळ्या तऱ्हेचा असतो व यांची रुचीही निरनिराळ्या प्रकारची असते. आंब्याचें झाड लाविल्यापासून सहाव्या सातव्या वर्षी

त्यास फळें येऊं लागतात. यांत कित्येकांत रेषा असते, कित्येकांत रेषा नसते, कित्येकाच्या आंतील फळाचा रंग पिंवळा असतो, कित्येकाचा तांबडा असतो व कित्येकाचा पांढराही असतो. या फळास वास तऱ्हतऱ्हेचा येतो, कित्येकास शेपा वास येतो, कित्येकास केशरासारखा वास येतो, कित्येकास रामफळासारखा येतो व कित्येकास पेरूसारखा येतो. इकडच्या प्रांतीं हापूस, पायरी, देवरूख्या, बनछोड, फरन्यांडीस, कावजी पाटील, पावशा, पाखऱ्या वगैरे पुष्कळ जातींचे नामांकित आंबे आहेत, त्या सर्वांचीं फळें निराळीं आहेत, गोडी निराळी आहे व स्वादही निराळा आहे; परंतु सर्वानुमतें हापूस हें उत्तम फळ आहे. हें फळ पिकल्यावर पुष्कळ दिवस राहतें, अशीं दुसरीं फळें आहेत तीं पिकल्यावर हापूसपेक्षांही पुष्कळ दिवस टिकतात, परंतु हापूससारखी रुचि व बिन रेष नसतात व कांहीं स्वादांतही कमी असतात. हापूस याला स्वाद चांगला असतो, गोडी चांगली असते व हा पुष्कळ दिवस टिकतो. आंब्याचें कलम घेतल्यावांचून पूर्वींच्या चांगल्या आंब्यासारखा निपजण्यास दुसरा मार्ग नाहीं, सबब हल्लीं कलमें बांधण्याचा बराच प्रघात सुरू झाला आहे. हे आंबे कोणच्याही जमिनींत होतात, परंतु तांबडी माती जशी मानवते तशी उत्तम काळ्या जमिनींत हीं झाडें मोठीं होत नाहींत. हें झाड लावल्यापासून तीनचार वर्षेंपर्यंत पाण्याला जपलें पाहिजे, पुढें याची पाण्याविषयीं विशेष खबरदारी घ्यावी लागत नाहीं; कलमी आंब्याचें झाड लावल्यापासून तिसरे वर्षीं त्याचा बार धरितात, परंतु त्यास पांचपंचवीस फळें सांपडतात. सातआठ वर्षांचें झाड झाल्याखेरीज त्याला यावीं तितकीं पुष्कळ फळें येत नाहींत. याचीं कलमें वगैरे बांधण्याची कृति मार्गें सांगितलीच आहे.

**अंजीर**—हें पेरूएवढें वाढणारें लहानसें झाड आहे. याचीं पानें कांहींशीं सागाच्या पानासारखींच असतात. याचीं कलमें जगतात. हीं झाडें काळ्या मातींत होतात, परंतु काळी व तांबूस अशी माती जेथें असेल तेथें तीं

चांगलीं होतात. हीं जेथें फार उष्ण व फार थंड हवा असते तेथें चांग-
लीं येत नाहींत, म्हणजे तेथेंही झाडें होतात व त्याला फळेंही येतात, परंतु
पिकत नाहींत व पिकलीं तरी पुण्याच्या आसपास जेथें थंडी व उष्णता
बेताची आहे तेथील झाडाच्या फळास जशी गोडी असते तशी त्यास नसते.
याच्या हिरव्या फळाची भाजी होते. यांना दोन बार येतात. पावसाळ्यांत
एक बार येतो त्याचीं फळें पिकत नाहींत, त्याचा उपयोग भाजीकडेसच
करितात व हिंवाळ्यांत जो बार येतो तीं चैत्र महिन्यांत चांगलीं पिकतात,
त्यांना गोडी चांगली असते. भाद्रपदमासीं त्यांच्या मुळ्या म
तोडतां ह्या झाडाच्या सभोंवतीं खणावें, त्यास कुजलेलें खत घालावें आणि
पाऊस नसल्यास पाणी द्यावें. नंतर हीं जोरानें फुटूं लागतात व त्यांस
हिंवाळ्यांत पुष्कळ मोठीं फळें येतात. हें जाड लावल्यापासून तिसऱ्या वर्षी
याचा बार धरितात. हें लहान असतें तेव्हां याला आठवड्यांतून दोनदां
पाणी द्यावें व मोठें झाल्यावर यास आठवड्यांतून एक वेळा पाणी दिलें
म्हणजे पुरे आहे. चैत्रवैशाखीं हीं फळें पिकण्याच्या सुमारास जर या-
च्यावर पाऊस पडला तर याची गोडी जाते.

**पोपया**–हें समोर वाढणारें फळ झाड आहे. हें कोणच्याही जमिनींत
चांगलें होतें. यांना पाणी फार सोसत नाहीं व फार ऊन जेथें असतें तेथेंही
होत नाहीं. हें लावल्यापासून चांगली जमीन असली तर एक वर्षानीं यास
फळें येऊं लागतात. याचीं पानें कांहींशीं एरंडासारखीं असून थोडीं मोठीं
असतात. यांत दोन जाति आहेत. एकाचें फळ वाटोळें असतें व एकाचें
लांबोडें असतें, त्याला गोडी विशेष असते. यांत पुरुषजातीचें एक झाड
निपजतें त्यास पेरूएवढालीं फळें पुष्कळ येतात, तीं लोंबत अ-
सतात व त्यास गोडी नसते. याला पुष्कळ फळें असतात तेव्हां हें झाड
मोठें सुरेख दिसतें. हें झाड चारपांच वर्षे टिकतें. हीं फळें उष्ण आहेत
ह्याचीं झाडें बियापासून होतात.

**लवंग**–याचें मूळ उत्पत्तिस्थान मलाका बेट होय. परंतु हीं फार दि-

वसांपासून अंबोयना बेटांतच होतात. हें झाड सुमारें आठदहा हात उंच वाढतें. याचीं पानें कांहींशीं महाळुंगाच्या पानासारखीं असून लहान असतात, याच्या पानास लवंगे सारखाच वास येतो व रुचीही लवंगेसारखी-च लागते. याचें लांकूड मऊ नसतें, पेरूसारखें कठिण असतें. याच्या फुलांच्या कळ्या त्याच लवंगा होत. याचीं नवीन झाडें बियापासून किंवा जडापासून होतात. याचीं झाडें लहान असतात तेव्हां फार नाजूक असतात म्हणून त्यांस विशेष जपावें लागतें. [illegible] कडक ऊन सोसत नाहीं या झाडास लावल्यापासून सहासात वर्षांनीं [illegible] लागतात [illegible] झाड तांबूस मातींत चांगलीं होतात.

**ऑलिव्ह**-हें बरेंच मोठें होणारें [illegible] फार थंडी नाहीं व फार उष्णता नाहीं अशा ठिकाणीं [illegible] प्रदेशांत उष्णता ६०-९० अंशांच्या [illegible] होतात याला जमीन चांगलीच पाहिजे असें नाहीं, [illegible] असली तरी चालते. याची विशेष लागवड [illegible] देशांत आहे. याच्या फळांचें तेल काढतात व तें स्वादिष्ट [illegible] झाडें बियापासून होतात व कलमेंही लागतात.

**अशफळ**—हें एक साधारण वाढणारें झाड आहे. [illegible] जातीपैकींच एक आहे. यास फळें पावसाळ्यांत येतात, तीं सुपारीएवढीं असून त्यांचे द्राक्षासारखे घोसचे घोस येतात. हीं [illegible] गोड नसतात. याचीं नवीन झाडें बियापासून होतात. हीं फळें ताजेपणींच खाविलीं पाहिजेत. हीं झाडें तांबड्या मातींत चांगलीं होतात, परंतु रेताळ जमीन यास विशेष मानवते.

**चेस्टनट**-हें उंच वाढणारें झाड आहे. याचीं पानें कढीलिंबाच्या पानासारखीं असून थोडीं मोठीं असतात, व तीं सभोंवतीं कातरलेलीं असतात. हीं झाडें उष्णदेशांत चांगलीं होत नाहींत, थंड देशांत चांगलीं होतात. स्पेन व पोर्तुगाल या देशांत याची लागवड पुष्कळ आढळते. हीं

फळें मोठयाशा सुपारीएवढीं असून तीं भाजून खातात. यांत दोन जाती आहेत. एक कडू व एक गोड. हीं झाडें आपले इकडे सुद्धां होतात. याला [illegible] चांगली मानवते. याला लांब लांब शेंगा येतात, त्यांत तीन [illegible] असतात. याचीं झाडें बियापासून होतात परंतु [illegible] आणिले पाहिजे.

**[illegible]**-हीं [illegible] असतात व बंगाल्यांत पुष्कळ ठिकाणीं [illegible] पाहण्यात नाहींत. हें झाड सुमारें [illegible] फळाचे घोंसचे घोंस येतात [illegible] नवीन झाडें बियापासून [illegible] होतात.

**[illegible]** [illegible] आहे. याचीं पानें बरींच मोठीं अस-[illegible] रंगाचीं मोठीं फुलें [illegible] नारळाएवढीं मोठीं असता-त, [illegible] बाहेरील टरफलाचा स्वाद [illegible] याची कढी चांगली [illegible] जमिनींत व जेथें दमट हवा [illegible] हीं झाडें पुष्कळ आहेत.

**[illegible]**-हें झाड [illegible] जातीपैकींच आहे. याचीं पानें [illegible] याचीं फळें झाडावर पिकत नाहींत, पाड लागला म्हणजे हीं उतरून कांहीं दिवस थंड जागेंत ठेवावीं लागतात म्हणजे तीं खाण्यास योग्य होतात. नवीन झाडें जडापासून होतात.

**तुमर**-हें झाड आपल्या देशांतील व आहे. हें सुमारें वीसपंचवीस हात उंच वाढतें व तें फार सुरेख दिसतें. याला पावसाळा लागण्याच्या सुमारास मोठीं पांढऱ्या रंगाचीं फुलें येतात. याचीं फळें नारिंगाएवढीं असून पिंवळ्या रंगाचीं असतात. बाहेरील साल फारच मऊ असते. [illegible]

फळें पावसाळ्याच्या अखेरीस पिकतात व तीं आंबट असतात. याचीं नवीन झाडें बियापासून होतात. हीं झाडें कोणच्याही जमिनींत होतात.

**फाळसा**—हीं झाडें लहान असतात. ह्याची लागवड सुरत जिल्ह्यांत बरीच आढळते. याचीं पानें धामणीच्या पानासारखीं कांहींशीं असतात. याचीं फळें मोठ्याशा वाटाण्याएवढीं असतात. तीं चैत्रवैशाख या महिन्यांत पिकतात व तीं किंचित् आंबट असतात. हीं झाडें कोणच्याही जमिनींत चांगलीं होतात, परंतु रेताळ जमीन त्यांस विशेष मानवते. याच्या फळाचें सरबत करितात.

---

## बागाइताविषयीं थोडी माहिती.

**ऊंस**—हा आपले देशांत बहुतकरून सर्व ठिकाणीं होतो व याला कोणच्याही प्रकारची जमीन असली तरी चालते. मळईची जमीन म्हणजे नदीच्या पुरानें वाहून आलेली माती, त्याला केवटा असें म्हणतात, त्या जमिनींत लाविला असतां चांगला येतो. उसांत दोनचार जाति आहेत, मारिशस, तांबडा, पटेरी व एक पुंडया. त्यांत मारिशस हा पांढरा असून आंगानें मोठा असतो. तांबडा हा फार जाड होत नाहीं व यास गोडी विशेष असते. पटेरी हा ऊंस आंगानें बराच जाडा होतो व मृदु असतो. परंतु हल्लीं मारिशस ऊंस पुष्कळ ठिकाणीं लावितात, कारण त्याचें उत्पन्नही बाकीच्या उसापेक्षां ज्यास्ती होतें आणि गूळ वगैरे चांगला होतो. या उसाला महिन्यांतून चार वेळ पाणी दिलें पाहिजे, कमी पडल्यास हा ऊंस पोकळ होतो आणि उत्पन्न व्हावें तसें होत नाहीं. उसाला जमीन तयार करणें झाल्यास निदान दोन वेळ सहा बैलानीं आडवी आणि उभी नांगरली पाहिजे व दोन वेळ या जमिनीवर आडवा उभा कुळव फिरवावा; नंतर दोन बैलांच्या नांगरानें सऱ्या पाडाव्यात. याला बिघ्याला साठ गाड्या कुजलेलें खत तरी घातलें पाहिजे, अधिक घातलें तर चांगलें. नंतर याचे वाफे बांधावे आणि तीनतीन डोळ्याचा एकेक उसाचा

तुकडा पाडून त्यांत तीं पेरीं लावावीत. पेरीं लावतेवेळीं मुळे, भेंडी, गोवारी, धने वगैरे दंडादंडानें लौकर होणारा भाजीपाला लावावा; म्हणजे त्या भाजीपाल्याच्या उत्पन्नानें त्याच्या दोन खुरपणीचा खर्च निघून जातो. नंतर श्रावण व भाद्रपद या महिन्यांत त्याची खणणी करावी आणि दोहों बाजूला ज्या सऱ्या असतात त्याची माती त्या उसाला भर घालावी; नंतर हा ऊंस काढण्यास पौष व माघ ह्या महिन्यांत तयार होतो, व ऊंस लावण्याचे दिवस पौष माघ हेच आहेत. चांगला ऊंस आला तर एक बिघ्यास ४०० रुपयांपासून पांचशें रुपये उत्पन्न होतें व ऊंस तोडल्यावर खालील बुडाला कोंम फुटतात त्याची खणणी करून बिघ्याला पन्नाससाठ गाडी या मानानें खत घातलें तर दुसऱ्या वर्षी तितकेंच उत्पन्न होतें, परंतु पहिल्या वर्षापेक्षा दुसऱ्या वर्षाच्या उत्पन्नांत फायदा ज्यास्ती राहतो, कारण नांगरणी व ब्याणें वगैरे याचा खर्च वांचतो. उसाच्या लागवडीला राखण, खुरपणी, पाणी, खणणी वगैरे मोठे मेहनतीचें काम आहे, जर मनुष्यें घरचींच काळजीचीं असलीं तर बिघ्यामागें सर्व खर्च जाऊन चांगला ऊंस आला तर निवळ सुमारें शंभर रुपये फायदा रहातो, परंतु ज्याला सर्व काम चाकर माणसाकडून मजूरीनें करावयाचें असतें, त्याला फायदा रहात नाहीं.

**राजगिरा**–हें धान्य बागाइतांत होणारें आहे. भाजीपाल्याची जी खतावलेली जमीन असते ती खणून अगर नांगरून काढून त्यांत राजगिरा पेरावा आणि त्यास चार दिवसांनीं पाणी देत जावें. हें झाड पोकळ्यासारखे सुमारें कमरे इतकें उंच वाढतें. हा कोणचेही जमिनीत होतो व कोणच्याही वेळीं होतो. लावल्यापासून तयार होण्याला चार महिने लागतात. कांहींचा रंग पांढरा असतो, कांहींचा काळा असतो. हा उपोषणास खातात, याच्या लाह्या वगैरे चांगल्या होतात.

**पानमळा**–पानमळ्याला एक बिघ्याला २००० तुकडे ( ब्याणें ) लागतात, याची लागवड श्रावण व भाद्रपद या महिन्यांत करितात व [illegible]

व वाळलेला पाला गुरांना चांगला मानवतो. याच्या शेंगाचे दाणे उपासास उपयोगीं पडतात व याचें तेल काढितात. तें तेल खाण्याच्या उपयोगीं पडतें व दिव्यालाही जाळतात. पेंड गुराच्या उपयोगीं पडतें. याचें कांहीं एक वांया जात नाहीं.

**कापूस**--हें झाड चारपांच फूट उंच वाढणारें आहे. हा कापूस जेथें पाऊस बेतानें पडतो तेथें चांगला होतो. कापूस पेरण्याचे पूर्वीं ही जमीन दोन वेळ नांगरून एक बिघ्यास पंचवीसतीस गाडया खत घालावें आणि त्यावर दोन वेळ कुळव फिरवून जमीन पाऊस पडण्याच्या अगोदर तयार करून ठेवावी, आणि पाऊस पडून जमिनीस चांगली ओल झाली म्हणजे रांगेनें हाताहाताच्या अंतरावर बीं लावावें व त्याची एक वेळ खुरपणी करावी. नंतर हा कापूस पांचसहा महिन्यांनीं तयार होतो. यावर हस्त नक्षत्राचा पाऊस पडला तर याचीं बोडें बिघडतात असें म्हणतात. या कापसामध्यें पुष्कळ जाति आहेत. एकीचा कापूस सरकीपासून लौकर निघतो व आंतील बीं काळी असते. दुसऱ्याची सरकी लौकर निघत नाहीं. एक कापूस आहे त्याची बी बोटभर लांब आहे, त्यास देवकापूस म्हणतात. याशिवाय याला देशपरत्वें नांवें पुष्कळ आहेत. नानकीनचा कापूस, हिंगणघाटाचा कापूस वगैरे पुष्कळ नावें आहेत; परंतु अमेरिकेंत जो कापूस पिकतो तो चांगला असतो, म्हणजे त्याचें बारीक सूत चांगलें निघतें. कापूस हा जिराईत जमिनींत तर होतोच, परंतु बागाईत जमिनींत कुपणाच्या बाजूला जेथें जमीन व्यर्थ जात असते, तेथें दोनदोन हातांच्या अंतरावर एकेक बीं लाविली असतां तीं झाडें फार मोठीं होतात व तीं चारपांच वर्षें राहतात आणि त्यांना कापूस पुष्कळ सांपडतो. जर या कापसाच्या झाडांना गुरांना वगैरे खाऊं दिलें नाहीं आणि बोंड पिकल्याबरोबर काळजीनें काढलें तर त्या एक बिघा जमिनींत जें उत्पन्न होणार त्याच्या पांचव्या किंवा सहाव्या हिशानें बिन खर्चावांचून

जमीन गुंतवल्याखेरीज उत्पन्न होतें, याकडे बागाईत करणारे लोकांनीं लक्ष पुरविलें असतां बराच फायदा होईल. कापसाला काळी जमीन चांगली मानवते.

**तंबाखू**—हें झाड सुमारें हात दोन हात उंच वाढणारें आहे. याचीं पानें सहा सात बोटें रुंद असतात व वीत दीड वीत लांब असतात. तंबाखू काळ्या जमिनींत होतो, परंतु पांढरी जमीन यास विशेष मानवते. ही जमीन उन्हाळ्यांत नांगरून कुजलेलें खत घालून पाऊस पडण्याच्या पूर्वीं तयार करून ठेवावी, नंतर पाऊस पडण्याच्या सुमारास वाफ्यांत बीं पेरून याचें रोप तयार करावें आणि श्रावण अखेर तें हाता हाताच्या अंतरानें एकेक रोप लावावें. याला खालीं फूट फुटते, ती काढून टाकावी नंतर याला आठ, दहा, बारा पानें फुटलीं म्हणजे वरचा शेंडा उडवावा, नंतर तें झाड पिवळें दिसूं लागलें म्हणजे बुडापाशीं कापून उन्हांत वाळत घालावें व तें एक बाजूला पांचसहा दिवस वाळलें म्हणजे तीं झाडें परतावीं आणि तीं पुन्हा पांचसहा दिवस वाळूं द्यावीं, नंतर त्यावर थोडें थोडें पाणी शिंपावें व नंतर खड्डा खणून त्याच्या खालीं बाजरीचें सरम पसरावें व त्यावर पातळ पातळ कडबाही घालावा. त्यावर हा तंबाखू सारखा लावून ठेवावा व आणखी वर कडबा व बाजरीचें सरम घालून खड्डा बुजवून टाकावा व सहासात दिवसांनीं तो उकरावा आणि मोठे देंठ काढून त्याच्या जुडया बांधाव्या. तंबाखू लाल दिसण्याकरितां खैराच्या सालीचें पाणी पुरण्याच्या अगोदर शिंपितात. तंबाखूला बोंडें येतात, याचें बीं फार बारीक असतें.

**मिरची**—याची लागवड कोणच्याही जमिनींत होते. पाऊस पडण्याच्या पूर्वीं याचें रोप तयार करून खतावलेल्या जाग्यांत हातहाताच्या अंतरावर दोनदोन झाडें लावावीत आणि पाऊस नसेल त्यावेळेस आठवडयांतून एकदां पाणी द्यावें व हीं झाडें महिन्यामहिन्यांनीं खुरपून यांच्या बुडाशीं कुजलेलें खत थोडथोडें घालावें आणि पाणी द्यावें, म्हणजे हीं

झाडें मोठीं होऊन यास पुष्कळ मिरच्या येतात. यांत पुष्कळ जाति आहेत, याबद्दल माहिती मागें क्यापसीकम यांत दिली आहे.

---

## बागेसंबंधीं हत्यारें.

बागेमध्यें कुदळ, पहार, टिकाव, कुऱ्हाड, कोयता, करवत वगैरे हत्यारें अवश्य पाहिजेत, यांची माहिती बहुतकरून सर्वांस असतेच, सब-ब विशेष लिहिण्याची गरज नाहीं; परंतु याशिवाय बागेंत अवश्य उप-योगी पडणारीं अशीं आणखी कांहीं हत्यारें आहेत, त्यांचीं नांवें व आ-कृति खालीं दिल्या आहेत.



**बाडिंग नाईफ**—( कलम बांधण्याचा चाकू ). हे चाकू पुष्कळ तऱ्हेचे असतात, त्यांपैकीं चार जातींचीं चित्रें वर दाखविलीं आहेत. हे चाकू उत्तम जातीच्या पोलादाचे केलेले असतात. यांची धार फार तीक्ष्ण असते, व यांच्या मुठी हस्तीदंती असतात; त्यांचीं शेवटें चपटीं असून टोंकास अणी असते, तेणेंकरून झाडाची साल उचकटून उंच उचलतां येते व आंत दुसऱ्या झाडाचा डोळा सहज भरतां येतो. या सर्व जातींच्या चाकूंचा उपयोग विशेषेंकरून गुलाब, संत्रें, कौलें, नारिंगें, मोसंबी वगैरेचे डोळे बांधण्याकडे होतो; परंतु आंब्यांचीं कलमें बांधण्याच्या कामींही यांचा उपयोग करितात.



**प्रूनिंग नाईफ**—( झाडें छाटण्याचा चाकू ). हे **चाकू पुष्कळ** तऱ्हेचे असतात, त्यांपैकीं कांहींचीं चित्रें वर दिलीं आहेत. या चाकूंपैकीं कांहींची मूठ वांकडी असते व कांहींचीं पातीं वांकडीं असतात. हे चाकू मजबूत असून त्यांची धार तीक्ष्ण असते, व हे झाडें छाटण्याच्या व कलमें करण्याच्या कामीं फार उपयोगी पडतात.



**प्रूनिंग शियर**--( झाडें छाटण्याची कातर ). या कातरीनें पायाच्या आंगठ्या एवढाल्या खांद्या झाडास इजा न होतां तेव्हांच छाटून टाकितां येतात. या कातऱ्यांला कमानी असतात, त्यामुळें खांद्या छाटते वेळीं हातास इजा न होतां त्या सहज छाटल्या जातात. यांच्याही पुष्कळ जाति आहेत, त्यांपैकीं एकीचें चित्र वर दाखविलें आहे.

याशिवाय एक गवत कापण्याची कातर असते, तिला इंग्रजींत **ग्रास लॉन शियर** असें म्हणतात. खेळण्याच्या जागेवर जें गवत उगवतें तें या कातरीनें सारखें कापितां येतें.

दुसरी एक फुलें कापण्याची कातर असते, तिला इंग्रजींत **फ्लावर**

**गॅदरर** असें म्हणतात. या कातरीचा उपयोग एवढाच आहे कीं, या कातरीनें कापलेलें फूल खालीं न पडतां कातरींतच अडकून रहातें, व तें दुसरा हात लाविल्याशिवाय टोपलींत टाकितां येतें. फूल कापल्यावर खालीं पडूं नये म्हणून या कातरीच्या पात्याला दुसरी एक पितळी पट्टी जोडलेली असते, तिचे योगानें फूल अडकून राहतें.

एक जातीचें हातखुरपें असतें, त्याला इंग्रजींत **ट्रावेल** असें म्हणतात. याचा विशेष उपयोग हा आहे कीं, त्याचे योगानें कुंडा खुरपून त्यानेंच त्या कुंडयांत जास्त नवीन माती घालितां येते. अशीं आणखी पुष्कळ तऱ्हेचीं हत्यारें असतात, परंतु जेवढीं बागेंत अवश्य लागतात तेवढ्याचीच माहिती फक्त दिली आहे.

**समाप्त.**

---

# जाहिरात.

## कोष्टक.

एक एकर जमिनींत एक फुटापासून तीस फुटांचे अंतरावर झाडें लावणें झाल्यास किती लागतील याचें कोष्टक:--

| अंतर. | एका एकरांत किती लागतील. | अंतर. | एका एकरांत किती लागतील. |
|---|---|---|---|
| फूट. | संख्या. | फूट. | संख्या. |
| ३० | ४८ | ९ | ५३७ |
| २८ | ५५ | ८ | ६८० |
| २६ | ६४ | ७ | ८८९ |
| २४ | ७५ | ६ 1/2 | १,०३१ |
| २२ | ९० | ६ | १,२०१ |
| २० | १०० | ५ 1/2 | १,४४० |
| १९ | १२० | ५ | १,७४२ |
| १८ | १३४ | ४ 1/2 | २,१५१ |
| १७ | १५० | ४ | २,७२२ |
| १६ | १६९ | ३ 1/2 | ३,५५६ |
| १५ | १९३ | ३ | ४,८४० |
| १४ | २२२ | २ 1/2 | ६,९७० |
| १३ | २५७ | २ | १०,८९० |
| १२ | ३०२ | १ 1/2 | १९,३६० |
| ११ | ३६० | १ | ४३,५६० |
| १० | ४३५ | | |

## कोष्टक.

एका मैलांत एक फुटापासून शंभर फुटांचे अंतरावर झाडे लावणें झाल्यास किती लागतील याचें कोष्टक:—

| अंतर. | एका मैलांत किती लागतील. | अंतर. | एका मैलांत किती लागतील. |
|---|---|---|---|
| फूट. | संख्या. | फूट. | संख्या. |
| १०० | ५२ | ३० | १७६ |
| ९५ | ५५ | २५ | २११ |
| ९० | ५८ | २० | २६४ |
| ८५ | ६२ | १५ | ३५२ |
| ८० | ६६ | १० | ५२८ |
| ७५ | ७० | ९ | ५८६ |
| ७० | ७५ | ८ | ६६० |
| ६५ | ८१ | ७ | ७५४ |
| ६० | ८८ | ६ | ८८० |
| ५५ | ९६ | ५ | १०५६ |
| ५० | १०५ | ४ | १३२० |
| ४५ | ११७ | ३ | १७६० |
| ४० | १३२ | २ | २६४० |
| ३५ | १५१ | १ | ५२८० |